


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.










अनुक्रमणिका

रजत–महोत्सवी मानाचा शिरपेच डोक्यात खोवून आता
सव्विसाव्या वर्षी अधिक थाटाने आपल्या भेटीला येत आहे

# दीपावली

दर्जेदार दिवाळी अंक

१९७०

दिलचस्प मुखपृष्ठ!
बहुरंगी कलाकृतींची वर्षभेट
संस्कृत नाटकांच्या नाट्यनायिका
नामवंत आणि नवोन्मेषशाली साहित्यिकांचे साहित्य -
कथा, शृंगारकथा, चरित्रकथा,
पारितोषिक विजेत्यांचे विनोदी साहित्य
एकांकिका, ललितलेख
बरखास्त झाला हा लोकशाहीचा फार्स! एक परिसंवाद!
आजच्या जीवनाचे खरेखुरे दर्शन अशी,
एक प्रक्षोभक कादंबरी! आणि
तीन दुरंगी मर्मचित्रमाला!!!
'संतप्त' कविता

मूल्य ४ रुपये +
रजि. पो. १ रु.
पृष्ठे २२५ वर

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

उद्याच्या
औद्योगिक प्रगतीची
**(चा) हूल**
राजकारणातील
बड्याबड्या धेंडांचे
**'लघु' उद्योग**
○○○○○○○○○
दुरंगी
मर्मचित्रमाला

इकडून थपडा, तिकडून थपडा !
बुद्रुकांच्या थोबाडावर थपडाच थपडा !!
**एक्स्पो [ झ ] ७०**
जपानमध्ये उघडायची राहून गेलेली
काही दालने ऐन दिवाळीत
**प्रेक्षकांना खुली करणार**

परत एकदा
**अनाचार**
**विद्यापीठ**
'भक्ष'लवादी
फॅकल्टी याने
फॅक्टरी
काही अभ्यासक्रम
○○○○○○○○○
रंगीबेरंगी
बिंगचित्रमाला

**हास्य चित्रांची कमाल ! रसिकांची धमाल !!**












# दीपावली

ऑक्टोबर १९७० ★ वर्ष २६ वे ★ मूल्य १॥ रु.

## श्रे य ना मा व ली

• गोमंतकाचे एक थोर समाजसेवक श्री. केशवराव अ. नायक – **श्रीनिवास दा. नायक** • टेम्पल व्हयू ? छे ! एक भयानक व्हयू... निरपराधित्व सिद्ध करण्याची धडपड ... **ना. व्यं. देशपांडे** • कपट...अशी मिळते सरकारी मदत...**दत्ता कदम** याशिवाय

**गांधीजींना स्मृत्यंजली** **आचार्य विनोबांना भावांजली**

**सुप्रिया कादंबरी** ◆ लेखक व छायाचित्रकार ◆ **पुरुषोत्तम बावकर**

**कविता... सन्मानपुष्प... रंगमंच... ऐसी अक्षरे रसिके...**

**कुटुंब–नियोजन पुरवणी**

तसेच

**आणखी एक ऑक्टोबर क्रांती** **मासिक विंगचित्रमाला**

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ३५७७६५

Gram : DALALART

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ. ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु. + रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay–4.







## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४
**टेलिफोन :** ३५७७६५ ★ **तारेचा पत्ता** DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५; द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०.

● **वर्गणी मनिऑडरने द्यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवायचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जवाबादारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटींग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथ छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# कलेला दाद लागते, आहे ना ठाऊक ?

गणांचा याचा अर्थ जनतेचा सेनापति असलेल्या विघ्नहर्त्या गणरायांचे वाजत गाजत स्वागत झाले आणि 'पुढल्या वर्षी लवकर या' असं आवाहन करीत, अतीव उत्साहाने जनतेने आपल्या सेनापतीला निरोपही दिला. धन–धान्य–समृद्धींचे सिंचन करीत गौरीही आल्या. हसल्या, बसल्या, जेवल्या, हितगुज करीत व सुखी संसाराची कानगोष्ट सुवासिनींना सांगत त्याही गेल्या. उत्सव आणि उत्साहाचं उधाण झेलून धरण्यासाठी जणु पावसाने आपले दोन्ही हात पालथे धरण्याच्या ऐवजी उपडे धरले. त्यामुळे उत्सवावर 'पाणी' पडले नाही. चार वर्षाच्या मुलापासून ते जख्ख म्हाताऱ्या माणसापर्यंत असंख्य माणसे उधाणून आलेली आम्ही अनंत चतुर्दशीला पाहिली. कान, मन, आणि नेत्र तृप्त झाले. दसऱ्याची तुतारीच जणु त्या ढोल, डिंडिम, लेझीम, नगारे यांच्या नादात आपला नाद मिसळून गर्जू लागली. 'दसरा सण मोठा, नाही आनंदा तोटा' ही नुसती कविता नाही. तो मनामनांचा हुंकार आहे. आनंदाचा, पराक्रमाचा, आत्मविश्वासाचा, स्वाभिमानाचा हुंकार आहे. 'विजयादशमी' येते ती विजयी इतिहास–परंपरेचे स्मरण देत देत आणि नव्या विजयाची नांदी गात गात. पण विजयादशमीच्या आगमनाची नांदी गणेशोत्सव म्हणतो आणि भरतवाक्य म्हटले जाते ते दिवाळीतल्या भाऊबीजेच्या दिवशी !

'दीपावली'च्या घरीही 'दीपावली' अंकाची नांदी म्हटली गेली. उत्साहाने, उमेदीने आणि पंचविशी पार पडलेल्या तरुणाच्या उत्साहाने. तरुण मन नेहमीच स्वप्नात दंग असते. यंदा पंचविशी पार केलेल्या 'दीपावली'ने अनेक स्वप्ने जपली आहेत. त्या स्वप्नांची मोहक, रंजक, प्रेरक भेट घेऊन आम्ही आपल्या स्नेहभेटीस निघणार आहोत. नजराण्याची ताटे तयार होत आहेत. एका ताटात आहे आगळ्या विषयावरची (दीपावलीला चाकोरी मान्य नाही. साचा पसंत नाही.) एक रसीली, भावरम्य कादंबरी ! एका तरुण मनाच्या, प्रयोगशील लेखकाची ! 'दीपावली'चे (आणि दीपावलीचेच) खास वैशिष्टय असलेल्या बहुरंगी नेत्राल्हादक चित्रमालांनी दुसरे ताट भरले आहे. संस्कृतातल्या सुसंस्कृत आणि सुडौल नाटय-नायिका त्यात दिसतील. दिलचस्प, बहुरंगी, बहुढंगी मुखपृष्ठाचं उपवस्त्र बाजूला केलं की, त्या तुम्हाला दिसतील. भारतातील लोकशाही आज अगतिक झाल्यासारखी दिसते. 'आहेही आणि नाहीही' असं केळकरी उत्तर वदवून घेते आहे ती ! "बस्स झाला हा फार्स", असे उद्‌गार घरात, गाडीत ऐकू येतात. याच विषयावर आम्ही अ-पक्षीय थोर राजकीय विचारवंत आणि निवृत्त सेनाधिकाऱ्यांचा एक परिसंवाद देत आहोत– ते ताट गच्च भरलय येवढंच सांगतो. (पुष्कळदा) मान्यवर लेखकांची नुसती यादीच असते. 'दीपावली'त त्यांचे 'मानधन' साहित्य असते असे आम्ही साभिमान म्हणू शकतो. चार दुरंगी बिंगचित्रमाला, (तथाकथित) तापसी तरुण कवींच्या निवडक कविता, मान्यवरांचे नवे संशोधन, नवा विचार मांडणारे लेख, पिकासो या जगप्रसिद्ध चित्रकाराचे नटरंगी जीवन मांडणारी रसीली जीवनगाथा आणि कितीतरी गोष्टी–– मूल्यातल्या प न् पैची परतफेड करणाचा प्रामाणिक प्रयोग, प्रयत्नातून पेश केलेल्या !! दिवाळी अंक वाचल्यानंतर याची कबुली देण्यात मात्र कंजुषी नको. कळावे. लोभ असावा ही विनंती.

कलेला दाद लागते, आहे ना ठाऊक ?

—संपादक








# एका अलौकिक क्रांतीचा उद्गाता !

**महाभारतात राजसूय यज्ञाचे वर्णन आहे. माझा हा प्रजासूय यज्ञ आहे. यात प्रजेचा अभिषेक होईल. असे राज्य ज्यात मजूर, शेतकरी, भंगी आदि सर्व समाजांतील की आमच्यासाठी काही झाले आहे अशा समाजाचे नाव सर्वोदय आहे. यातूनच प्रेरणा घेऊन मी फिरत आहे.**

**— विनोबा**

भारताची एक संस्कृती आहे, परंपरा आहे, अस्मिता आहे. आणि त्या अस्मितेचे, संस्कृति-परंपरेचे स्तन्य पिऊन प्राप्त कालाच्या विशाल भूधरावर ज्यांनी आपली नावे स्वयंकर्तृत्वाने कोरली आहेत अशा आधुनिक योग्यात आचार्य विनोबा भावे ह्यांचा समावेश करावा लागेल.

ह्या देशात सेवा, त्याग, निष्ठा, मूल्ये, साधना आदि गोष्टी आता सभा संमेलने व प्रवचने येवढ्यापुरत्या निदान कानी तरी येतात. पण आपलं जीवन 'जाणिजे यज्ञकर्म' ह्या श्रद्धेने ज्ञान आणि समाज यांच्या सेवा-उपासनेत सदा-रत असलेले आचार्य विनोबा भावे पाहिले की वाटतं की अजूनही ती तेजस्वी परंपरा संपलेली नाही.

आचार्य विनोबा भावे हे एक समर्पित पुष्प आहे. खऱ्या अर्थाने समर्पित पुष्प आहे. गांधींच्या भोवती अनेक माणसे जमली. त्यांनी चळवळ मोठी केली. तेही मोठे झाले. सेवेची भावना जोपासली गेली. पण स्वराज्यानंतरही आपली सेवा, उपासना, आपले समाजपरिवर्तनाचे प्रयोग ज्यांनी सोडून दिले नाहीत अशा व्यक्तीत विनोबांचा समावेश होतो. प्रथम श्रेणीची बुद्धिमत्ता, गांधींचा सहवास व संपादन केलेला विश्वास, स्वातंत्र्य चळवळीतील कृतिशील भाग, स्वतंत्र चिंतन, निर्भयतेने ते मांडण्याचे व कार्यान्वित करण्याचे धैर्य आणि संसारादि पाशातून मुक्त असे जीवन ऐवढ्या भांडवलावर विनोबा प्रयत्नशील असते तर भारताच्या स्वराज्यातले 'मानकरीपण' काही त्यांना लांब नव्हते. पण विनोबांचा पिंड ज्ञानयोग्याचा, कर्मयोग्याचा, सेवकाचा! त्यांचे समाजपरिवर्तनाचे प्रयत्न चालूच राहिले. आचार्य विनोबांची भूदान, ग्रामदान, ग्रामसेवा संघ या साऱ्या योजना. माणसातल्या योजना माणसातल्या देवत्वाला आणि माणुसकीला साद घालणाऱ्या आहेत. "उद्धरेदात्मनात्मानं" ह्या जातीच्या आहेत.

आचार्य विनोबा हे काही पक्षीय भाटचारण नसल्याने त्यांनी अलिकडेच एक लेख लिहिला असून त्यात त्यांनी पक्षाधिष्ठित लोकशाही या विषयावरील आपली मते मांडली आहेत. पक्षाधिष्ठित लोकशाहीच्या प्रयोगातील उणीवा त्यांनी स्पष्टपणे मांडल्या असून ४९ विरुद्ध ५१ च्या बहुमताने निर्णय घेण्याच्या चालू पद्धतीमुळे खुद्द लोकशाहीवरच आघात झाला आहे. चालू लोकशाहीत वैर, सौदा, आयारामी, गयारामी, जात, प्रांत, भाषादि भेदांचा 'अराष्ट्रीय' उपयोग करून सत्ता केंद्रीत करण्याची प्रवृत्ती यांची जोपासना झाली असल्याचे ते सांगतात. आजची लोकशाही ही मतदानापुरती लोकांची असली तरी वस्तुतः ती श्रीमंताची, श्रीमंतांसाठी आणि श्रीमंतांकडून चालविली जाणारी, थोड्या जाणत्यांची व असंख्य अप्रबुद्धांची अशी यंत्रणा बनली असल्याचे ते म्हणतात. त्यांचे हे विधान फार बोलके आहे. गेल्या तेवीस वर्षात 'तज्ञ' कुजले, बुरसले आणि पक्षीय झुंड, गुंड व अज्ञ यांनी 'लोकशाही'ला सौदेबाजीचे गुलाम करून हास्यास्पद बनविले आहे ते आपण पाहतो. विनोबा म्हणतात की अज्ञ झुंडांच्या लोकशाहीचा प्रयोग झाला, फसला. आता दहा वर्षे विविध क्षेत्रातल्या 'तज्ञ' अशा माणसांच्या हाती कारभार सोपवा. विनोबा स्वयंप्रज्ञ आहेत. निर्भय आहेत. 'जनसेवे'चा भक्कम आधार असल्याशिवाय कोठलेही 'जन-राज्य' टिकणार नाही. म्हणूनच ते ग्रामसेवा संघाचा पुरस्कार करतात. सेवा सांगणारे अलिकडे गल्लीबोळात भेटतात. पण सेवेचे 'तप' आचारणारे विनोबांसारखे दीपस्तंभ विरळा. जीवेत् शरदः शतम् ॥

● ● ●

## गोमंतकाचे एक थोर समाजसेवक

# श्री. केशवराव अनंत नायक

**--श्रीनिवास दा. नायक**

श्री. केशव अनंत नायक यांचे नाव घेतले की एक शांत, सौम्य वृत्तीची व धीरगंभीर अशी व्यक्ती आपल्या मनश्चक्षूंसमोर उभी राहते. पण प्रसंग आला तर ही व्यक्ती तितकीच खंबीर व करारी आहे असे आपल्याला आढळून येईल. श्री. नायक यांचा जन्म आपल्या लहानशा गोमंतकात झाला हे आमचे सुदैव तर एका दृष्टीने पाहता त्यांचे दुर्दैव होय. महाराष्ट्रातील सातान्याचे कर्मवीर शिंदे किंवा भाऊराव पाटील अथवा पुण्याचे महर्षि धोंडो के. कर्वे यांचीच ही गोमंतकातली लहानशी प्रतिमा होय, हे त्यांच्या कार्याची माहिती असणारांना मनोमन पटल्याशिवाय राहणार नाही. श्री. नायक यांच्याकडे आपण केव्हाही गेलो तर त्यांच्या दिवाणखान्यात प्रवेश करताच असे दृश्य दिसेल की, वृत्तपत्रे, मासिके व सार्वजनिक संस्थांचे वृत्तांत जिथे तिथे पसरले आहेत व या पसाऱ्याच्या मध्यभागी ते काहीतरी लेखन करण्यात गुंतले आहेत. पण आपल्याला पाहताच हातातील काम बाजूला सारून ते सुहास्य मुद्रेने आपले स्वागत करतील आणि मग संभाषणात जी चर्चा होईल ती केवळ सामाजिक, शैक्षणिक किंवा अन्य सार्वजनिक कार्याबद्दलची असेल. त्यांच्या

---

**गोमंतकाच्या शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रातील अत्यंत तळमळीचे कार्यकर्ते श्री. केशवराव अनंत नायक यांच्या वयाला सप्टेंबर महिन्यात पंचाहत्तर वर्षे पूर्ण होऊन त्यांनी शहात्तराव्या वर्षात पदार्पण केले. येत्या नोव्हेंबर महिन्यात गोव्यामध्ये त्यांचा अमृत-महोत्सव मोठ्या थाटाने साजरा होणार आहे. या निमित्ताने आम्हीही श्री. नायक यांना विनम्रभावाने अभिवादन करून हे सन्मानपुष्प त्यांना अर्पण करीत आहोत आणि त्यांना दीर्घायुष्य, उत्तम आरोग्य आणि भरपूर मनःस्वास्थ्य लाभो अशी प्रार्थना करतो – संपादक**

---

बोलण्यात आजचा व कालचा गोमंतक, किंबहुना आजचे व जुने मडगाव यासंबंधीच्याच गोष्टी प्रामुख्याने येतील आणि जुन्या आठवणी सांगताना ते अगदी रंगून गेलेले दिसतील. गोमंतकात गाजलेले एकीवेकी प्रकरण असो किंवा मडगावातील सालोमालोंच्या दुष्ट प्रवृत्तींवर प्रहार करणाऱ्या 'घोट' पत्रकांचे प्रकरण असो, त्यासंबंधी अगर मुलींच्या शिक्षणासाठी त्यांनी गेल्या चाळीस-पंचेचाळीस वर्षांपासून चालविलेल्या प्रयत्नांसंबंधी ते तासन् तास बोलत राहतील.

श्री. केशवराव नायक यांचा खरा पिंड सामाजिक कार्यकर्त्याचा. समाजसुधारणेच्या दृष्टीनेच त्यांचे सर्व प्रयत्न चाललेले असतात.



आपले कार्य ते प्रसिद्धीपराङ्मुख राहून करीत असतात, कारण स्वतःच्या प्रसिद्धीपेक्षा ते कार्यसिद्धीला अधिक महत्त्व देतात. स्वतःच्या संसाराकडे देखील थोडबहुत दुर्लक्ष करून आपल्या सामाजिक संसारास वाहून घेतलेले असे हे गृहस्थ आहेत. त्यांना सांसारिकदृष्ट्या चार अपत्ये, पण सार्वजनिक कार्यक्षेत्रात त्यांनी आपली म्हणून मानलेली दोन संस्थारूपी अपत्ये आज आपल्यासमोर दिमाखाने उभी आहेत. "सारस्वत ब्राह्मण समाज" किंवा आजचे "गोमंत विद्या-निकेतन" हे त्यांचे पहिले अपत्य होय. या संस्थेच्या स्थापनेपासून ते २७ वर्षे तिच्या चिटणीसाच्या पदावर होते. सुरुवातीला ग्रंथपालाचे कामच नव्हे, तर वाचनालयाच्या जागेत झाडलोट करण्यापासूनची कामे त्यांना करावी लागली. केवळ मेणबत्त्या पेटवून स्थापन झालेल्या 'सा. ब्रा. समाजा'चे कार्य पुढे किती महत्त्वाचे झाले हे त्यावेळचे त्या संस्थेचे वृत्तांत वाचल्यास अभ्यासू वाचकाला कळून येईल. पन्नास वर्षांपूर्वी या संस्थेची एका आठवड्याची वार्षिक व्याख्यानमाला किती गाजत असे याची कल्पना जुन्या पिढीतील माणसांकडूनच करून घ्यावी लागेल. सामाजिक सुधारणेच्या चळवळीच्या पुरस्कारा-मुळे 'सा. ब्रा. समाजा'वर अनेक गंडांतरे आली, पण त्यांना केशवराव नायक यांनी धैर्याने व निश्चयाने तोंड दिले. विरोधक कितीही समर्थ व हट्टी असला तरी त्याच्यापुढे वाकणार नाही, अशा जिद्दीने व करारी वृत्तीने त्यांनी अंगीकृत कार्य चालू ठेवले. तो काळ कसा होता आणि त्या काळाची ती व्याख्यानमाला कशी गाजत असे याची कल्पना एकदोन उदाहरण दिल्याशिवाय येणार नाही. सन १९२१ साली व्याख्यानमालेत दि. १३ एप्रिल रोजी मुंबईच्या 'सोशल सर्व्हिस लीग'चे अनंत वि. चित्रे यांचे 'मद्यपान' या विषयावर एक व्याख्यान आयोजित करण्यात आले होते व दुसऱ्या दिवशी त्याच लीगचे गं. नी. सहस्रबुद्धे यांचे 'जनसेवा' या विषयावर व्याख्यान व्हावयाचे होते. पहिल्या 'मद्यपान' या विषयावरील व्याख्यानात विवरणाला मॅजिक लँटर्नच्या साह्याने दृश्य चित्रांची

जोड देण्यात यावयाची होती. त्या काळी गोव्यात सिनेमा नव्हता. व्याख्यानाची खूप जाहिरात झाली व मडगावातील 'आर्य मंदिरा-मंडळा'न बेत केला की, कसेही करुन व्याख्यान बंद पाडावयाचे, अगर मॅजिक लॅंटर्नच्या साहृयाने चित्रे दाखवितेवेळी होणाऱ्या अंधारात संधि साधून मारामारी करावयाची. पण चालकांच्या खंबीरपणामुळे एकंदर व्याख्यान सुरळीतपणे पार पडले व लोक घरोघर गेले.

मदिरामंडळाने ठराविक जागी आपले गुंड ठेवून चालकांपैकी ठराविक व्यक्तींना मार देण्याचा व्यूह आधीच रचला होता; पण संस्थेचे एक अभिमानी कै. पंढरीनाथ वा. हेगडे यांच्या अकल्पित धाडसामुळे तो फसला. पुरोगामी मंडळीवर जुन्या लोकांची करडी नजर जाऊन गुंड घालण्याचे प्रकार जसे इतर ठिकाणी झाले होते, तसेच त्या काळी गोव्यातही झाले होते. संस्थेच्या संस्थापकांपैकी कै. भाई देसाई व केशवराव नायक यांना थोडा त्रास झाला.याच सालच्या व्याख्यानमालेत दुसरे एक व्याख्यान स्वातंत्र्यवीर सावरकर यांचे बंधू डॉ. ना. दा. सावरकर यांचे ठेवण्यात आले होते. ते सर्व जन्मजात क्रांतिकारक. त्यांचे व्याख्यान पोर्तुगीज राजवटीत गोव्यात कसे होईल, याबद्दल जशी सर्व गोमंतकीयांस चिंता वाटत होती तशीच ती संस्थेच्या चालकांसही वाटत होती. प्रसंगी काय होईल, गोवा सरकार कसे पाऊल टाकील, याचा अंदाज करता येत नव्हता. सावरकर गोव्यात आले व व्याख्यान सुरू झाले ते या शब्दात :– "आम्ही बंधू कैद किंवा जेल यांना भीत नाही. जे काही सांगावयाचे ते मी सांगणार, त्या कामी मी कोणाचीही पर्वा करणार नाही. मग त्याचे परिणाम जे काही होतील ते भोगण्यास मी मागे नाही." या व्याख्यानाने सरकारी गोटात फारच खळबळ उडाली व संस्थेवर सरकारची इतराजी झाली.

आणखी एक प्रसंग सांगण्यासारखा आहे. संस्था सामाजिक सुधारणेच्या बाबतीत शक्य ते प्रयत्न चालू ठेवीत असल्यामुळे हिंदु समाजातील अस्पृश्यता नष्ट व्हावी याविषयी जनमत शिक्षित करण्याच्या दिशेने संस्थेची हालचाल चालू होतीच. येथील अस्पृश्य समाजातील एक प्रमुख गृहस्थ श्री. विष्णु देवजी मिरजकर यांनी त्यावेळचे स्वसमाजातील मुंबई कौन्सिलचे सभासद श्री. काजरोळकर हे कीर्तन करीत असत, त्यांना १९२७ साली मडगावी कीर्तनाकरता आमंत्रण दिले. श्री. मिरजकर यांनी येथल्या देवस्थानांच्या किंवा मंदिरांच्या चालकांची आगाऊ परवानगी घेतली होती व देवळात जिथे घंटा असते तिथे घंटेखाली राहून कीर्तन करण्याची त्यांना परवानगीही देण्यात आली होती. पण ऐन वेळी ती नाकारण्यात आली. गावात अन्यत्र कुठेही कीर्तनाकरता जागा मिळण्याची आशा खुंटल्यावर मिरजकरांनी केशवराव नायक यांची सा. ब्रा. समाजाचे चिटणीस या नात्याने गाठ घेऊन संस्थेने कीर्तनाकरता जागा द्यावी अशी विनंती केली. या वेळी संध्याकाळचे ६ वाजले होते. सनातनी



### आम्ही हे असे

सगळेच आम्ही
कमरेला पंचे लावून
( घड्याळाला चावी देऊन )
सूत कातीत बसलो असतो
तर तुझं काय झालं असतं ?
कितीदाही क्रुसावर चढलास,
कितीही गोळ्या खाल्ल्यास
(नव्या झोपेच्या खातात तशा)
तरी आम्ही मुळीसुद्धा बदलणार नाही
आमचा चरखा वेगळाच आहे
त्याच्या चाकावर एक सहल आहे
धार काढायची...



### हातोहात

ज्या दिवशी आम्ही
तुला केलं महात्मा
त्याच दिवशी आम्ही
हातावर तुझ्या
ठेवला होता हौतात्म्याचा गूळ
हे तुला कधीच कसं
कळलं नाही ?
एवढा कसा हातोहात
रातोरात
फसलास तू ?
बरं नव्हे असलं खूळ...

— सदानन्द रेगे

मंडळीचा विरोध कुठपर्यंत होईल याची कल्पना नव्हती. तरीदेखील त्याबद्दल किंचितही विचार न करता केशवराव नायकांनी स्वयंसेवकांकडून बोर्ड फिरवून कीर्तनाच्या जाहिरातीची व्यवस्था केली. रात्रौ ८ वाजता कीर्तन झाले. त्याला सुधारक व सनातनी मंडळीचा बराच मोठा समुदाय उपस्थित राहिला.

सा. ब्रा. समाज या संस्थेचे कार्य वाचनालय, व्याख्यानमाला किंवा सामाजिक सुधारणा इतक्यापुरतेच मर्यादित नाही. तर शिक्षण, साहित्य तसेच राजकारण या क्षेत्रातही संस्थेने केलेले कार्य महत्त्वाचे आहे. सभासद या नात्याने असो किंवा सार्वजनिक कार्याची आवड असलेली व्यक्ती या नात्याने असो निरनिराळ्या कार्यकर्त्या लोकांचा संबंध संस्थेकडे अधिकाधिक येऊ लागला,आणि त्यांच्यात सार्वजनिक प्रश्नांसंबंधी विचारविनिमय होऊ लागला. अशा रीतीने अशा सर्व समविचारी लोकांचे संस्था हे मध्यवर्ती ठिकाण झाले व यातून अनेक कार्यांचा पाया घातला गेला.

१९१६ साली संस्थेने गोमंतकातील मराठी शिक्षणक्षेत्रात एकसूत्रीपणा आणण्याकरिता 'मराठी शिक्षणसंमेलना'चा पाया घातला. १९३७ साली संस्थेच्या रौप्यमहोत्सवप्रसंगी शिक्षण-संमेलनाचे तिसरे अधिवेशन प. वा. प्रो. वा. वा. सावर्डेकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आले.

१९३४ सालच्या संस्थेच्या वार्षिकोत्सवाचे अध्यक्ष सुप्रसिद्ध साहित्यिक मामासाहेब वरेरकर यांच्या आगमनाचा फायदा घेऊन संस्थेने गोमंतकीय वाङमयोपासकांचे एक संमेलन भरविले. या संमेलनाची कल्पना केशवराव नायक यांचीच होती. या संमेलनातूनच गोमंतक साहित्य-संमेलनाचा जन्म झाला. १९३० साली मडगावात १५ वे महाराष्ट्र साहित्य संमेलन भरले त्याला निमंत्रण देण्याच्या कल्पनेचा उच्चार प्रथम संस्थेच्या केंद्रातच झाला.

अशा या सा. ब्रा. समाजाचे ऑनररी सेक्रेटरी या पदाची जबाबदारी त्यांनी २७ वर्षेपर्यंत कोणताही मोबदला न घेता स्वतःच्या संसाराकडेही काहीसे दुर्लक्ष करून पार पाडली. 'जनसेवा हीच ईश्वरसेवा' हे वचन आचरणात आणणारे ते गृहस्थ आहेत. असा माणूस गोव्यात त्या काळी किंवा आजहि विरळाच, हे निराळे सांगण्याची गरज नाही.

आता आपण त्यांच्या संस्थारूपी दुसऱ्या अपत्याकडे वळू. सुमारे तीसचाळीस वर्षांपूर्वी गोमंतकात मराठी शिक्षण सामान्यतः तीन ते चार इयत्तांपर्यंतचे असे. क्वचित एखाद्या शाळेत पाचवीचा वर्ग असे. मडगावात १९१३ साली श्रीदामोदर विद्यालयाची स्थापना झाली. सा. ब्रा. समाजाचे वाचनालयही याच इमारतीत आणण्यात आले. १९१६ पर्यंत दोन्ही संस्था याच इमारतीत होत्या. त्यानंतर विद्यालय श्रीदामोदर विद्याभुवनाच्या इमारतीत गेले. १९२० साली वार्षिक मदतीकरता आकडे घेण्यात येऊन श्रीदामोदर विद्यालयाची नवीन व्यवस्था करण्यात आली. आणि पुढे १९२४ साली 'शिक्षण प्रसारक संघ' ही संस्था स्थापन होऊन तिच्यामार्फत श्रीदामोदर विद्यालय चालविण्यात येऊ लागले. त्यानंतर १९२७ साली विद्यालय 'मठग्रामस्थ हिंदुसभे'च्या ताब्यात देण्यात आले. १९२७ पर्यंत श्रीदामोदर विद्यालयाची केशवराव नायक यांनी यथाशक्ती सेवा केली. त्यानंतर आपल्या विचारप्रणालीस अनुसरून व विशेषतः स्त्रीशिक्षणाचे कार्य करावे या उद्देशाने काही मंडळींनी 'समाजसेवासंघ' ही संस्था स्थापन केली. तिचे अध्वर्यु केशवराव नायक हेच होते. सुमारे तीन दशकांपूर्वी मुलींची अशी निराळी शाळा नसे; पण केशवरावांनी अशी शाळा चालविण्याची जबाबदारी पत्करली. त्यामुळे मुलींचे 'महिलाविद्यालय' सुरू झाले. सुरुवातीस व्हर्नाक्युलर फायनलच्या परीक्षेला मुली जात असत. या कामी त्यांना त्यावेळचे शाळेचे मुख्याध्यापक श्री. ज. भि. राऊत यांचे सहकार्य लाभले. पुढे विस्तार वाढला व शाळेचे नूतन नामकरणे 'महिला व नूतन मराठी विद्यालय' असे होऊन तिचे मुलामुलींच्या हायस्कुलात रूपांतर झाले. या हायस्कूलाने गोव्यात चांगलाच नावलौकिक मिळविला आहे. हायस्कुलाची आजची भरभराट पाहून त्यांना साहजिकच साभिमान आनंद वाटतो व आपला बहुतेक वेळ ते विद्यालयाच्या कार्यातच घालवीत असतात.

'महिला विद्यालय' स्थापन करताना संस्थापकांपुढे तीन प्रमुख उद्दिष्टे होती. त्यावेळी गोव्यात चालू असलेल्या ३००-४०० मराठी शाळांपुढे लायक शिक्षक कसे मिळतील, अशी एक कठीण समस्या उभी राहिली होती. महाराष्ट्रात शिक्षकांना ५० रु. सुरवातीचा पगार व ५० रु. महागाई भत्ता मिळू लागल्यामळे पूर्वीप्रमाणे गोव्याबाहेरील शिक्षक मिळणे शक्य नव्हते. यावर येथेच शिक्षक तयार करणे हाच उपाय होता. गोव्यातील परिस्थितीमुळे येथे मुलगे मराठी शिक्षकाचा




आमची पण ऑक्टोबर क्रांती-"आर्थिक"








# दीपावली

## दिवाळी अंक १९७०

### दिवाळी अंकाच्या मानकऱ्यांची ही श्रेयनामावलीच पहा....

▲ पु. भा. भावे ▲ अरविंद गोखले ▲ वि. वा. शिरवाडकर ▲ रणजित देसाई ▲ चित्रकार द. ग. गोडसे ▲ जयवंत दळवी ▲ डॉ. गोवर्धन पारीख ▲ प्रभाकर पाध्ये ▲ दि. के. बेडेकर ▲ ले. ज. शंकरराव थोरात (निवृत्त) ▲ मो. ग. रांगणेकर ▲ अच्युत बर्वे ▲ सदानंद रेगे ▲ मधु मंगेश कर्णिक ▲ आनंद साधले ▲ प्रभाकर अत्रे ▲ श्रीराम कामत ▲ सुभाष भेंडे ▲ माधव राजवाडे ▲ राजाराम हुमणे ▲ राजेंद्र बनहट्टी ▲ सुरेश वेंगुर्लेकर ▲ ह. मो. मराठे ▲ अरविंद ताटके ▲ शंकरराव खरात ▲ डॉ. अनिल अवचट ▲ ह. शि. खरात आणि काही संतप्त कवींच्या काही आगळ्या कविता.

### ....आणि अंकाच्या यशस्वितेची आपणच कल्पना करा!

| पृष्ठसंख्या २२९ वर | किंमत चार रुपये | अधिक रजिस्टर्ड पोस्टासाठी एक रुपया |
|---|---|---|

एजंटाकडून दि. १० ऑक्टोबरपर्यंत आलेल्या मागणीचाच विचार केला जाईल नंतर आलेल्या मागण्यांबद्दल खात्री देता येत नाही.



अनुक्रमणिका

पेशा स्वीकारण्यास पुढे येणे शक्य नव्हते, म्हणून मुलींतूनच शिक्षिका मिळविण्याची व्यवस्था करणे जरूर होते. मुलींना ७ इयत्तांपर्यंतचे व नंतर ट्रेनिंगचे शिक्षण देऊन शिक्षिकेचा पेशा स्वीकारण्यास अनुकूल स्थिती प्राप्त करून दिल्याने ही गोष्ट साध्य होण्यासारखी होती. मुलींच्या शिक्षणाद्वारे शाळांपुढे उभी असलेली समस्या सोडविण्यास मदत करणे हे महिला विद्यालयांच्या चालकांपुढील पहिले उद्दिष्ट होते. याशिवाय स्त्रियांच्या शिक्षणाद्वारे सामाजिक सुधारणा दृढमूल होण्यास अनुकूल परिस्थिती निर्माण करणे आणि स्त्रियांना स्वावलंबी होण्यास मदत करणे अशी आणखी दोन उद्दिष्टे त्यांच्यापुढे होती. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर विद्यालयापुढील पहिले व तिसरे अशी दोन उद्दिष्टे पूर्णपणे साध्य झाल्याचे दिसून येईल. जेथे पूर्वी सरकारी शाळांतून एकही मराठी शिक्षक नव्हता, तेथे आज सरकारी मराठी प्राथमिक शाळांतून अंदाजे दोन ते अडीच हजार मराठी शिक्षक आहेत. शिक्षकांपैकी मुलींची संख्या अंदाजे १२०० ते १३०० आहे. महिला विद्यालय आणि मराठी माध्यमातून शिक्षण देणाऱ्या इतर शाळा यांनी आतापर्यंत त्यागपूर्वक कष्ट घेऊन दिलेल्या शिक्षणामुळे सर्व मराठी शाळांना शिक्षकांचा पुरवठा झाला, मध्यम वर्गाची आर्थिक स्थिती सुधारली व शिक्षणाचा प्रसारही झाला.

अशा रीतीने केशवराव नायक यांनी मराठी शिक्षण व मराठी शाळा यांसाठी केलेली कामगिरी कौतुकास्पद आहे. आज आपल्या दोन्ही संस्थारूपी अपत्यांना मडगावात व गोमंतकात लाभलेली प्रतिष्ठा पाहून त्यांना समाधान वाटणे स्वाभाविक आहे. माझ्या माहितीप्रमाणे पणजीतही मुलींची शाळा व्हावी, यासाठी त्यांनी पणजीकरांच्या प्रयत्नांस अल्पसा हातभार लावला आहे.

* *










इन्स्पेक्टर वाक़ाटकरांच्या सूचनेप्रमाणे सब-इन्स्पेक्टर दुधाट यांनी बृहन्मुंबईतील सर्व लाँड्र्यांची यादी तयार केली. या कामात त्यांचा संपूर्ण दिवस गेला. तेवीस ऑक्टोबरची रात्र एकदाची संपली.

दुसऱ्या दिवशी, म्हणजे २४ ऑक्टोबरला सब-इन्स्पेक्टर दुधाट आणि गौड या दुकलीने खेतवाडी बारावी गल्ली येथे असलेल्या अमेरिकन एक्स्प्रेस लाँड्रीला भेट दिली. या लाँड्रीची खूण A-1 आहे हे त्यांनी तयार केलेल्या यादीवरून समजलेच होते. त्यांनी आपल्यावरोबर पंचनाम्याच्या वेळी सापडलेले शर्ट, कापडाचा तुकडा वगैरे बरोबर घेतलेच होते. अमेरिकन एक्स्प्रेस लाँड्रीचे मालक श्री. परशुराम नारायण शेणोलीकर हे होते. त्यांनी वरील कपड्याच्या धोबी खुणा आपल्या लाँड्रीच्या असल्याचे ओळखले. पोलीसांनी त्यांना सी. आय्. डी. ऑफिसात आणून त्याच धोबीखुणा असलेले इतर कपडेही शेणोलीकरांना दाखविले. तेही त्यांनी ओळखले. SBH ही आद्याक्षरे ज्याच्या कपड्यावर होती ते गिऱ्हाईक बऱ्याच दिवसांपासून आपले कपडे आपल्या लाँड्रीत धुवायला देत असल्याचे त्यांनी सांगितले. तसेच A Z ही आद्याक्षरे असलेले कपडे अलीकडेच धुवायला येत असल्याचे आणि ते गिऱ्हाईक S B H गिऱ्हाईकाबरोबर येत असल्याचे त्यांनी सांगितले. शेणोलीकर या दोन्ही गिऱ्हाईकांना ओळखू शकत होते.

दुधाट आणि गौड यांनी मोठीच कामगिरी बजावली होती! कारण या दुव्यावरून संभवनीय गुन्हेगारांना पकडणे पुष्कळच सुकर होणार होते. ज्याअर्थी S B H हे गिऱ्हाईक याच लाँड्रीत कपडे धुवायला देते त्याअर्थी त्याचे वास्तव्य तरी तेथे असले पाहिजे किंवा त्या भागात म्हणजे खेतवाडीत—त्याचा नेहेमी वावर होत असला पाहिजे. इन्स्पेक्टर वाकाटकर यांनी आपल्या शिपायांकरवी त्या भागात चौकस नजर ठेवण्याची व्यवस्था केली. ते आणि सब-इन्स्पेक्टर गौड स्वतः जातीनेही फिरत होते. त्यादिवशी संध्याकाळी सुमारे सहा वाजता या दोघांनी खेतवाडी बॅक रोडवर सय्यदअल्ली उर्फ अझीझ या इसमास पकडले. थोड्याच वेळाने सुमारे सात वाजता फॉकलंड क्रॉसलेन येथे एक मनुष्य संशयास्पद स्थितीत फिरताना त्यांना दिसला. वाकाटकर आणि गौड या दुकलीला पाहताच तो झटकन् एका सार्वजनिक मुतारीत शिरला. या दोघांचे त्याच्या

—ना. व्यं. देशपांडे



# टेम्पल व्ह्यू!

## छेः एक भयानक व्ह्यू!

**....आमच्या पसंतीचा वकील आम्हांस मिळालाच पाहिजे...त्यासाठी भरपूर वेळ मिळाला पाहिजे.... आणि तसे नाही झाले तर? तर म. गांधीजीनी दाखविलेल्या मार्गाने आम्ही गेल्याशिवाय राहणार नाही....न्यायालयीन सत्यकथेचा हा चित्तथरारक उत्तरार्ध ....**

हालचालींवर पूर्ण लक्ष होतेच. मुतारीच्या दुसऱ्या बाजूने बाहेर पडत असतानाच त्या माणसास त्यांनी शिताफीने अटक केली. त्याचे नांव सय्यद बाकर हुसेन असे होते. त्या दोघांनाही सी. आय्. डी. ऑफिसमध्ये नेण्यात आले.

ऑफिसमध्ये सय्यद बाकर हुसेन याची अंगझडती घेण्यात आली. त्याच्या अंगावर ड्रायव्हरचा गणवेश होता. त्यावरही A1 S B H अशा धोबीखुणा होत्या. त्याच्या अंगझडतीत मिळालेल्या उल्लेखनीय वस्तू म्हणजे एक मोटार ड्रायव्हिंग लायसेन्स, एक किल्ल्याचा जुडगा, चष्मा आणि एका कागदी पाकिटात एक हजार नऊशेपाच रुपयांच्या नोटा. शंभरच्या एकोणीस व पाचाची एक अशा त्या नोटा होत्या. शंभर रुपयांच्या नोटांच्या चवडीमधल्या एका नोटेच्या वॉटरमार्कवर काही आद्याक्षरे होती. ती आद्याक्षरे पोलीसांच्या चाणाक्ष नजरेतून सुटली नव्हती. शिवाय तीन चांदीचे रुपये होते.

त्यापैकी दोनांवर पाचव्या जॉर्ज राजाचे व तिसऱ्यावर व्हिक्टोरिया राणीचे मुखवटे होते. नोटांसोबत एक लाँड्रीची पावतीही होती. त्याच्या नेसत्या कपड्यासहीत सर्व वस्तूंचा पंचनामा करून त्या ताब्यात घेण्यात आल्या. अंगझडती चालू असताना सय्यद वाकर हुसेनच्या डाव्या गालावर ओरखडचाच्या खुणा दिसल्या. उजव्या हाताच्या आंगठ्यावरही एक छोटीशी जखम दिसून आली. या जखमांचा उल्लेखही पंचनाम्यात कटाक्षाने करण्यात आला.

सय्यद अल्ली अझीझ यास पुढील तपासासाठी सब-इन्स्पेक्टर दुधाट यांच्या स्वाधीन करण्यात आले. सय्यद वाकर हुसेन याची चौकशी स्वतः इन्स्पेक्टर वाकाटकर आणि सब-इन्स्पेक्टर गौड हे करीत होते. चौकशी अंती सय्यद वाकर हुसेन हा पूर्वी चुनावालांच्याकडे नोकर असल्याचे आढळून आले. प्रश्नांचा अधिक भडिमार करताच, सय्यद वाकर हुसेन याने 'चुनावालासाब' यांची चीजवस्तू आपण जेथे नेऊन ठेवली आहे ती जागा दाखवून ती चीजवस्तू हजर करण्याचे मान्य केले. तावडतोब दोन पंच बोलावण्यात आले. त्यांच्यासमक्षही सय्यद वाकरने तेच सांगितले. त्याची जबानी त्यांच्या समक्षच लिहिण्यात आली. मग गाडीत बसून सय्यद वाकर, दोन पंच, इन्स्पेक्टर वाकाटकर इतर वरिष्ठ अधिकाऱ्यांसह बाहेर पडले.

भारतीय कायद्यानुसार आरोपीने पोलीसांपुढे दिलेल्या कसल्याही जबानीचा उपयोग फिर्यादी पक्षास खटल्याच्या कामी करता येत नाही. न्यायालयात सादर करावा लागणारा पुरावा हा स्वतंत्र असावा लागतो. याला फक्त एकच अपवाद आहे. एखाद्या गुन्ह्याचा तपास चालू असताना, पोलीस अधिकाऱ्यांच्या स्वाधीन असलेल्या आरोपीने काही एक माहिती सांगितली आणि त्या माहितीच्या अनुरोधानेच एखादी बाब उजेडात आली तर तेवढी संबंधित जबानी पुराव्यात सादर करता येते. उदाहरणार्थ आरोपीने सांगितले की 'मी वापरलेला चाकू जेथे पुरून ठेवला आहे ती जागा दाखवितो आणि तो चाकू काढून हजर करतो' या माहितीनुसार त्याने जागा दाखविली व तो चाकू तेथे सापडला तर (१) आरोपीने अशा प्रकारचा जबाब दिला (२) हा चाकू पुरून ठेवल्याची गोष्ट व जागा त्याला ठाऊक होती (३) त्यानेच ही जागा दाखविली (४) त्याप्रमाणे चाकू मिळाला ह्या चारही बाबी आरोपीविरुद्ध सिद्ध करता येतात.

मोटार चालविण्यास सी. आय्. डी. विभागाचे दुसरे एक इन्स्पेक्टर श्री. मोकाशी स्वतःच बसले होते. सय्यद वाकरने त्यांना मार्गदर्शन केले. त्यानुसार त्यांनी खेतवाडी बॅकरोडवरील पटेलवाडीसमोर गाडी उभी केली. सय्यद वाकरने पोलीस आणि पंच यांना त्या वाडीतील घर नं. १८७।१८९ येथे नेले. त्या घरामध्ये कुमारी मनिजेब कात्रक या नावाची पारशीण राहात होती. या ठिकाणी (म्हणज या मजकुराच्या ठिकाणी) काही वाचक आनंदाने मिटक्या मारतील ! पण तसले काही लफडे नव्हते हो ! ही कुमारी कात्रक पासष्ट वर्षांची जरठबाला होती! तिच्याशिवाय फरेदून इराणी ('आन' या जुन्या रंगीत चित्रपटामुळे प्रसिद्धीस आलेला छायाचित्रकार इराणी नव्हे !) नावाचा एक गृहस्थ बसला होता. सय्यद वाकरने त्या घरात जाऊन व्हरांड्यातील एका टेबलाखाली असलेल्या एका हिरव्या ट्रंकेकडे बोट दाखविले. तीवर एक सूटकेस होती. त्यान ती खालची ट्रंक पुढे ओढून घेतली. पोलीसांनी अगोदरच ताब्यात घेतलेला त्याचा किल्ल्यांचा जुडगा त्याने मागून घेतला आणि त्यांतील एक किल्ली चालवून त्याने ट्रंकेचे कुलूप उघडले. वर असलेले कपडे उपसून त्याने त्याखालील वस्तू बाहेर काढण्यास आरंभ केला. जादुगाराने पोतडीतून एखादी आश्चर्यकारक वस्तू बाहेर काढावी त्याप्रमाणे सय्यद वाकरने एक प्लॅस्टिकची हिरवी पिशवी बाहेर काढून हजर केली. ती उघडू पाहता तीमध्ये पुढील वस्तू आढळल्या :—

एक कागदाचे पुडके, त्यावर 'श्रीमती आर. एम्. एस्. चुनावाला यांचा इंडो–पाकिस्तानी पासपोर्ट' असा मजकूर इंग्रजीत लिहिला होता. त्या कागदी पुडक्यात विविध नमुन्याचे तीन सोन्याचे हार आणि एक सोन्याची मनगटी होती. दुसऱ्या एका कागदी लिफाफ्यावर महंमद सिद्दिक चुनावाला यांचे नाव व पूर्ण पत्ता लिहिलेला होता. त्या लिफाफ्यात विविध आकृतीबंधाचे सोन्याचे, मोत्यांचे दागिने, कर्णभूषणे, मौल्यवान खडे व आंगठ्या होत्या.

ट्रंकेमध्ये पाच विविध नमुन्यांची, स्त्रियांची मनगटी घड्याळे मिळाली. एक टाईमपीस होते. रोकड रक्कम रुपये ७४७ सापडली. यापकी एक रुपयाच्या नोटांचे शंभर रुपयांचे एक बंडल होते. तीन अरेबियन नोटा होत्या. हिंदुस्थानवर अधिपत्य गाजवणाऱ्या व ब्रिटिश राजघराण्याचे सिंहासन भूषविणाऱ्या तीन पिढ्यांचे कर्तृत्व सांगणारे सात चांदीचे रुपयेही तेथे आढळले. एक व्हिक्टोरिया राणीची द्वाही फिरविणारा होता, तीन तिच्या मुलाचे व तीन तिच्या नातवांचे होते. या सगळ्या वस्तूंचा बारकाईने पंचनामा करून त्या ताब्यात घेण्यात आल्या. या ट्रंकेतील कपड्यांवरही A-1 S. B. H. या धोबीखुणा होत्या हे नमूद करणे जरूर आहे.

त्या हिरव्या ट्रंकेवरची सूटकेस कोणाची असे पोलीसांनी विचारताच सय्यद वाकरने ती सूटकेस आपला मावसभाऊ सय्यद अल्ली अझीझ याची असल्याचे सांगितले. सय्यदअल्ली अझीझ यास दुधाट यांच्या स्वाधीन अगोदरच केले होते. त्याला तावडतोब मनिजेब कात्रकच्या घरी घेऊन येण्यास दुधाट यांना निरोप पाठविण्यात आला. थोड्याच वेळात अझीझसह ते येऊन पोचले. तत्पूर्वी त्याचीही अंगझडती घेण्यात आली होती. त्याच्याकडे विशेष महत्त्वाचे असे काही मिळाले नव्हते. फक्त नऊ रुपये, एक शिकाऊ ड्रायव्हिंग लायसेन्स आणि एक चाव्यांचा जुडगा मिळाला होता. या सर्व वस्तू जप्त करण्यात आल्या होत्या.

पटेलवाडीत आल्यानंतर त्यास सूटकेस उघडण्यास सांगितले. त्याने दुधाट यांच्याकडून आपल्या चाव्यांचा जुडगा मागून घेतला. त्यांतील एका चावीने त्याने सूटकेसचे कुलूप उघडले.

या सूटकेसमधून मूल्यवान चिजा बाहेर पडल्या. त्यांत चार वेगवेगळ्या नमुन्यांची मनगटी घड्याळे होती. सोन्याच्या बांगड्या,

अनुक्रमणिका






सोन्या–मोत्यांचे त्यांच्या पदकांसह असलेले सर, सोन्याच्या व खडे असलेल्या मोरण्या व आंगठ्या या सर्व मूल्यवान वस्तू एका लिफाफ्यांत एकत्र आढळल्या. तो लिफाफा रेडिओ क्लब लिमिटेडकडून आलेला होता. पत्त्यावर चुनावाला यांचे नांव व संपूर्ण पत्ता होता. दुसऱ्या एका लिफाफ्यावरही त्यांचे नाव व संपूर्ण पत्ता होता. तो लाईफ इन्शुरन्स कॉर्पोरेशनकडून आला होता. त्यात एकंदर बेचाळीस रुपये सहासष्ट पैशाची नाणी होती. त्यातली उल्लेखनीय बाब अशी की ही नाणी सुटया अवस्थेत नव्हती तर एक रुपया सत्तर पैशांच्या नाण्याच्या पंचवीस पुडया व सुटे पैसे होते. शिवाय मोती लावलेले सोन्याचे डूलही होते.

सूटकेसमध्ये अझीझचे कपडे होते. ते सर्व सैनिकी पेशाचे होते. तो भारतीय सैन्यातील नोकर होता हे दर्शविणारी अनेक कागदपत्रे होती. त्याच्या बहुतेक सर्व कपडयांवर A हे आद्याक्षर व एक त्रिकोण (सरकारी नव्हे!) धोब्याच्या शाईने काढलेला होता. दोन शर्टांवर मात्र त्रिकोणाव्यतिरिक्त A-1 S. B. H. अशा धोबी खुणा होत्या. एका गंजिफ्रॉकवर त्रिकोणाव्यतिरिक्त A-1 A Z अशी धोबीखूण होती. या सर्व वस्तूंचा व त्याच्या तेथे सापडलेल्या वळकटया-अंथरुणे यांचा पंचनामा करून त्या ताब्यात घेण्यात आल्या. वरील सर्व मौल्यवान वस्तू आणि पैसे चुनावाला कुटुंबाचेच आहेत यात कसलाही संशय नव्हता. फक्त त्यांची ओळख चुनावालांच्या माहितीतल्या माणसांकडून पटवून घ्यायची होती. चोवीस तासाच्या आत, हत्याकांडात बळी पडलेल्या इसमांच्या वस्तू या दोघांच्या ताब्यात मिळाल्यामुळे या दोघांनीच चुनावालांच्या घरातील चार माणसांची हत्या करून त्यांची चीजवस्तू चोरून नेली असली पाहिजे असा निव्वळ तर्क निघत होता!

दोन्ही गुन्हेगारांना अटक झाल्याचे समजताच डेप्युटी कमिशनर सामी यांना अगदी हायसे वाटले. त्यांनी व्यंकटरमणाला केलेला नवस काही फुकट गेलेला नव्हता. ही त्यांच्या कारकीर्दीतील महत्त्वाची अशी शेवटची केस होती. त्यांनी तावडतोब विमानाने तिरुपतीला जाण्याची व्यवस्था केली. तिरुपतीला जाऊन व्यंकटेशाची पूजा बांधून ते तावडतोब विमानानेच मुंबईस परतले!

इन्स्पेक्टर वाकाटकरांनी सर्व मौल्यवान वस्तूंची जवाहिऱ्याकडून किंमत करवली. ती अकरा हजार सहाशे रुपयांच्या आसपास होती. आरोपी आणि मुख्य मुद्देमाल हाती आल्यानंतर तपासाची चक्रे आता अधिक वेगात फिरू लागली. वृत्तपत्रांत, खुन्यांना शिताफीने अटक करण्यात आल्याच्या वार्ता पहिल्याच पानावर दिमाखात झळकल्या आणि मुंबई पोलीसांची शान अधिकच वाढली. मुंबईच्या नागरिकांना हायसे वाटले.

वाकाटकरांनी अमेरिकन एक्स्प्रेस लाँड्रीच्या शेणोलीकरांना पुनः बोलावणे पाठविले. पोलीसांच्या ताब्यातील आरोपींना त्यांनी तावडतोब ओळखले. आरोपी सय्यद बाकर हा तर सात आठ महिन्यां-





अनुक्रमणिका

पासून वरचेवर आपले कपडे धुण्यास देण्यासाठी आपल्या लाँड्रीत येत असल्याचे त्यांनी सांगितले. तो अनेक वेळा आपल्या लाँड्रीत आल्याचा पुरावा म्हणून S. B. H. आद्याक्षरांच्या अनेक पावत्यांच्या स्थळप्रती त्यांनी हजर केल्या. आरोपी अझीझ हा मात्र अलीकडेच ८।१० दिवस सय्यद वाकर याजबरोबर लाँड्रीत येत असल्याचे त्यांनी सांगितले. त्याची खूण A Z होती व त्याच्या सांगण्यावरूनच ही आद्याक्षरे त्याच्या कपड्यांवर काढलेली होती. त्याही पावत्यांच्या स्थळप्रती शणोलीकरांनी हजर केल्या.

सय्यद वाकर याची चुनावालांच्याकडील नोकरी सुटल्या-नंतरही तो त्यांच्याकडे येतजात असे ही गोष्ट सय्यद वाकरनेच सांगितली होती. यासंबंधी मिस्त्री आचार्यास प्रश्न विचारताच त्याने गुन्हा झालेल्या दिवशी सय्यद वाकर घरी येऊन गेला होता ही गोष्ट सांगितली. आपल्या जबावात त्याने असेही सांगितले की सय्यद बाकर याजबरोबर आणखीही एक इसम आला होता. त्याच्या खाणाखुणाही सांगितल्या. त्याबरोबर लागलीच ओळखपरेड घेण्यात आली. या परेडमध्ये आरोपी अझीझ यास मिस्त्री आचाऱ्याने ओळखून काढले.

दोन्ही आरोपी कुमारी मनिजेव कात्रक या पारशी स्त्रीच्या घरी राहात होते. २२ ऑक्टोबरच्या संध्याकाळी व २३ ऑक्टोबरच्या सकाळी दोन्ही आरोपींच्या काय हालचाली झाल्या यासंबंधात तिची जबानी घेणे आवश्यक होते. पोलीसांना तिने सांगितलेली हकीकत खरोखरच महत्त्वाची होती. पुढे खटल्याच्या वेळी सेशन कोर्टास तिने पुढीलप्रमाणे साक्ष दिली :

मनिजेव कात्रक पासष्ट वर्षाची म्हातारी होती. तिच्या डोळ्यांचे मोतीबिंदूचे ऑपरेशन झाले होते. दृष्टी अधू असल्याने ती चष्मा वापरीत असे. तिचे दोन भाऊ फरामजी आणि रुस्तुमजी हे दोघेही तिच्याच बिऱ्हाडी राहात. दोघेही (पारशी जमातीच्या वैशिष्ट्यास अनुसरून) अविवाहित होते. उदरभरणाची सोय म्हणून या म्हातारीने खाणावळ ठेवली होती. काहीजणांना 'पेइंग गेस्ट' म्हणूनही राहण्यास ती परवानगी देई. फरेदून इराणी नावाचा पारशी गृहस्थ तिच्याकडे पेइंग गेस्ट म्हणून राहात होता. फरामजी आणि फरेदून डुंगरवाडीत शववाहकाचे काम करीत. रुस्तुम कुठल्याशा सॉलीसिटर फर्ममध्ये नोकरी करीत असे. दोघेही आरोपी तिच्याकडे राहत. सय्यद वाकर हा पेइंग गेस्ट म्हणून सुमारे दीड वर्षापासून तिच्याकडे राहात होता. त्याला व्हरांड्यात झोपण्यासाठी जागा दिली होती. व्हरांड्यात, झोपता येईल इतक्या लांबी रुंदीचे एक टेबल होते. त्यावर सय्यद वाकर आपली पथारी पसरत असे. त्या टेबलाखालीच आपली ट्रंक आणि पथारी तो ठेवीत असे. आंघोळ करण्यापुरताच त्याचा घरात वावर होता. जेवण मात्र तो बाहेरच घेत असे. चुनावालांचा खून होण्यापूर्वी सुमारे दहाबारा दिवस अगोदर अझीझ हा सय्यद वाकर याजबरोबर आला होता. तो आपला मावसभाऊ असून मिलिटरीत कामाला असल्याचे सय्यद वाकरने सांगितले होते. व्हरांड्यात आपल्या बाजूलाच त्यालाही झोपण्यासाठी कुमारी मनिजेवची परवानगी सय्यद वाकरने घेतली होती. अझीझ हा देखील आपली वळकटी व सूटकेस, सय्यद वाकरच्या ट्रंकेजवळ, त्या टेबलाखालीच ठेवीत असे.

मनिजेवचा दैनंदिन कार्यक्रम अगदी ठरीव स्वरूपाचा असे. तिच्या घरी पाणी फक्त दोनदाच येई आणि तेही पहाटे व संध्याकाळी एक एक तासापुरते! यासाठी तिला पहाटे चार वाजता उठावे लागे. घरातील पिंपात ती पाणी भरून ठेवी, आपल्या भावाला जागे करी. त्याच्यासाठी पावणेपाचच्या सुमारास चहा करून देई. आंघोळीसाठी पाणी तापवून ठेवी. नंतर पुनः डुलकी घेत असे. मग सकाळी ६/६॥ च्या सुमारास उठून ती दिवसाच्या कामाला लागे. सय्यद वाकर सकाळी आठ वाजता आंघोळ करी व साडेआठच्या सुमारास कामाला बाहेर निघून जाई, तो रात्री नवाच्या सुमारास घरी परतत असे. त्याचा मावसभाऊ आल्यापासूनही त्याचा हाच कार्यक्रम असे.

बावीस ऑक्टोबर रोजी रविवार होता. सय्यद वाकरला सुटी होती. तरीही तो नित्याप्रमाणेच सय्यदअल्ली अझीझ याजबरोबर सकाळी साडेआठाला बाहेर पडला होता. दुपारी ते केव्हा आले ते तिने पाहिले नव्हते. परंतु दुपारी साडेतीन वाजता ते पुनः बाहेर पडल्याचे तिने पाहिले होते. रात्री नेहमीच्या वेळेस ते त्या दिवशी परतले नाहीत. तेवीस ऑक्टोबरला मनिजेव नित्याप्रमाणे पहाटे चाराला उठली. बाहेरचे दार किंचित् किलकिले करून बघितले. पण तेथे आरोपी दिसले नाहीत. तिने बाहेर येऊन पाहिले तेव्हा त्यांच्या वळकटचा गुंडाळून टेबलावर ठेवलेल्या आढळल्या. पावणेपाचच्या सुमारास ते दोघेही परतले. 'कोठे गेला होतात?' असे तिने सहजगत्या विचारताच 'आम्ही कव्वाली ऐकायला गेलो होतो' असे सय्यद वाकरने उत्तर दिले. 'आपणाला तावडतोब आंघोळ करायची आहे' असे ते म्हणाले. फरामजीला आंघोळ करायची होती म्हणून तिने त्यांना थोडा वेळ थांबण्यास सांगितले. पण त्यानी अगोदर आंघोळ केल्यास फरामजीची हरकत नव्हती म्हणून तिने त्यांना आंघोळ करण्यास परवानगी दिली. सकाळी साडे आठ वाजता सय्यद वाकर नित्याप्रमाणे बाहेर गेला. अझीझ मात्र घरीच बसून होता. तो दुपारी तीन वाजेपर्यंत घरातच होता. दुपारी मनिजेव आपल्या डॉक्टरकडे गेली होती. तेथून परत संध्याकाळी येताच अझीझला पकडून नेल्याचे समजले. थोड्याच वेळाने सय्यद वाकर घरी आला. त्याला ही बातमी देताच, 'काय लफडे आहे ते बघून यतो व त्यास सोडवून आणतो' असे सांगून तोही बाहेर सटकला. त्या दिवशी सकाळी वर्तमानपत्रात चुनावालांच्या भीषण खुनाची हकीकत सर्व वर्तमानपत्रांत छापून आली होती. 'जामे—जमशेद' या गुजराती वर्तमानपत्रातील बातमी वाचताच मनिजेवने सय्यद वाकरला ही बातमी सांगितली होती. ही बातमी ऐकताच त्याने कसलीच प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. तो पूर्वी चुनावालांच्याकडे

कामाला होता हे मनिजेवला ठाऊक होते म्हणूनच तिने ही बातमी त्याला सांगितली होती. चुनावालांच्याकडून त्याचे पगाराचे दोन हजार रुपये येणे होते. ते त्यांनी न दिल्यामुळे आपण त्यांची नोकरी सोड-ल्याचे सय्यद बाकरनेच खुद्द एकदा सांगितले होते. त्याच रात्री साडेआठला पोलीस आरोपीसह आले. त्यांच्या ट्रंकेची व सूटकेसची झडती घेण्यात आली वगैरे हकीकत तिने कोर्टाला सांगितली.

### कथेतून उपकथा

चुनावालांचा खून झाल्यामुळे शहरात बरीच खळबळ माजली होती. नाना तऱ्हेचे तर्कवितर्क केले जात होते. या गदारोळातच एका भुरट्याने या म्हातारीला हातोहात फसवूने तिचे दागिने लंपास केले होते. त्याची गंमत अशी झाली की, तारीख सव्वीस ऑक्टोबर रोजी एक अनोळखी इसम आपण पोलीस अधिकारी असल्याची बतावणी करीत तिच्या घरी आला. चुनावालांच्या घरी झालेल्या चोरीतील दागिन तुझ्याकड आहेत. त्यासाठी तुझ्या दागिन्यांची तपा-सणी करावयाची आहे असे दरडावताच तिने विचारीने आपले दागिने त्याला दाखविले. ते दागिने कचेरीत तपासासाठी हवे आहेत असे सांगून, ते घेऊन तो भुरटा पसार झाला. तो पोलीस अधिकारी नव्हता हे नंतर तिच्या लक्षात येताच तिने लॅमिंग्टन रोड पोलीस स्टेशनावर फिर्याद दिली. तो भुरटा सापडला नाही तो नाहीच ! विचारीचे सातशे रुपयांचे दागिने मात्र गायब झाले !

या गोष्टींचा आरोपीच्या वकीलांनी तिच्या उलटतपासणी-साठी कौशल्याने उपयोग करून घेतला. तिच्या मोतीबिंदूचे ऑप-रेशन झाले होते व तिची दृष्टी अधू होती हे त्यांनी तिच्याकडून वद वून घेतलेच होते. त्यामुळे पहाटे आरोपी व्हरांड्यात नव्हते हे तिचे म्हणणे विश्वासार्ह नाही असे कदाचित् त्यांना सुचवायचे होते. आरोपींव्यतिरिक्त शंकर नावाचा एक इसम तिच्या घरी वरचे-वर येत असे. त्याला नेहेमी पैशाची गरज असे. तो अधूनमधून फरामजीकडे उसनवार पैसे मागे. वापरण्यासाठी कपडेही मागे. त्याचप्रमाणे बाबू नावाचा इसमही काही दिवस झोपायला येत असे. तसेच विष्णू नांवाच्या इसमालाही तिने दरमहा चाळीस रुपये घेऊन घरामध्ये झोपण्यास काही दिवस परवानगी दिली होती. पैशाची वारंवार जरुर भासणारी माणसे तिच्याकडे येत व कदाचित् त्यांनीही खून केला असण्याची शक्यता आहे अशी गर्भित सूचना या प्रश्नांमागे होती. शिवाय कपड्यांची उसनवारी शंकर करीत असल्याने त्याने वापरलेले कपडे चुनावालांच्या घरात सापडले आहेत असेही भास-विण्याचा यात प्रयत्न होता. मनिजेवचा भाऊ फरामजी यास चोरीची सायकल जवळ बाळगली म्हणून मागे एकदा शिक्षा झाली होती हे मनिजेवने कबूल केले. फरामजी व फरेदून हे नेहेमी चोरबाजारा-तून चिजा आणीत व विकीत व यासंबंधात दोघांनाही अटक करण्यात आली होती या बचाव पक्षाच्या सूचनेचा तिने इन्कार केला. यासंबंधी आपणास काहीच ठाऊक नाही असे ती म्हणाली. तिच्या घरात तीनचार टाईमपीसेस् होती. तिचा भाऊ गजर लावीत असे व उठत असे. तेव्हा त्यास पावणेपाच वाजता जागे करण्याची जरुरीच नव्हती असा बचावपक्षाचा युक्तिवाद होता. मनिजेवने याही गोष्टीचा इन्कार केला. या वरवर निरर्थक वाटणाऱ्या प्रश्नांचा उद्देश द्वयर्थी होता. अशा संशयास्पद व्यक्तींना थारा देणारी बाई–हिच्या साक्षीवर विश्वास तरी कसा ठेवावा ? शिवाय त्या संशयास्पद व्यक्तींनीच त्या चोरीतील चिजा घरी आणून ठेवल्या असाव्यात व त्यांनीच खून केला असावा. हा दुसरा रोख.

तेवीस ऑक्टोबर रोजी पहाटे पावणेपाच वाजता आरोपी घरी आले व त्यांनी आंघोळीचा आग्रह धरला ही गोष्ट खोटी असून केवळ पोलीसांच्या दबावाने ही गोष्ट बनावट रचून तू सांगत आहेस अशीही सूचना आरोपीच्या वकीलांनी उलटतपासणीत केली. मनि-जेवच्या घरी तिच्या दागिन्यांची चोरी झाली होती. 'तू फिर्यादी-पक्षातर्फे व्यवस्थित, आम्ही सांगू तशी–जबानी दिल्यास तुला तुझे दागिने मिळवून देऊ' अशी पोलीसांनी लालूच दाखविल्यामुळे मनि-जेव खोटी साक्ष देत आहे असेही बचावाच्या वकीलांनी सुचविले. अर्थात् या सर्व सूचनांचा मनिजेवने ठासून इन्कार केला.

सव्वीस ऑक्टोबर रोजी आरोपी अझीझ यास घेऊन पोलीस पुनः एकदा तिच्या घरी आले होते. अझीझने त्यावेळी, घरात ठेवलेल्या तीन लाँड्रीच्या पावत्या एका एक्सरसाईज् बुकातून काढून दिल्या होत्या. ही देखील हकीकत मनिजेवने कोर्टाला सांगितली. त्याशिवाय दोन रेल्वे वॉरंटस् व दोन रेल्वेची तिकीटेही त्याने हजर केली. त्या पावत्यांपैकी दोन पावत्या अमेरिकन् एक्स्प्रेस लाँड्रीच्या होत्या व एक पावती ओमेगा वॉशर्स या लाँड्रीची होती. यापैकी दोन पावत्यांवरची तारीख २३–१०–१९६७ अशी होती. या पावत्यांचे महत्त्व काय होते हे पुढे कळेलच.

आरोपींच्याकडे सापडलेले दागदागिने व इतर मौल्यवान वस्तू या चुनावाला कुटुंबाच्याच आहेत हे सिद्ध करण्यासाठी त्यांची ओळख पटविणे जरूर होते. चुनावालांची मुलगी जहिरा हिने तर या साऱ्याच वस्तू ओळखल्या. काही दागिन्यांच्या पावत्याही पंच-नाम्याच्या वेळी मिळाल्या होत्या. त्यावरून ते दागिने तयार करणारे सोनार आणि सराफ यांची नावे समजली होती. त्यांचेही जाबजबाब

घेण्यात आले होते. त्यांनी आपापल्या दुकानातून तयार झालेले दागिने पोलीसांपुढे व पुढे खटल्याच्या वेळीही कोर्टात ओळखले.

याशिवाय हे दागिने ओळखणारी आणखी एक व्यक्ती होती. ती चुनावाला कुटुंबियांच्या घरोब्यातील होती. ती म्हणजे श्रीमती बतुल ताहेर मर्चट ही होय. श्रीमती बतुल या 'कार मार्ट' कंपनीच्या डायरेक्टर होत्या. त्या दररोज कंपनीच्या ऑफिसमध्ये जाऊन स्वतः कामाची देखभाल करीत, चुनावाला यांना मदत करीत. शिवाय त्यांचे चुनावाला कुटुंबाकडे वरेच जाणे-येणे होते. त्यांच्या कुटुंबातील सर्व समारंभाना त्या जात असत. बावीस ऑक्टोबरच्या संध्याकाळी श्री. व सौ. चुनावाला ही उभयता त्यांच्या घरी गेली होती. श्रीमती बतुल यांनीही पुष्कळसे दागिने व मनगटी घड्याळे आपण ओळखत असल्याचे सांगितले. कारण त्यांनी पुष्कळ समारंभात सौ. चुनावाला व त्यांची मुलगी जहिरा यांनी ते वापरलेले पाहिलेले होते. श्रीमती बतुल यांची साक्ष आणखी एका लहानशा गोष्टीसाठी महत्वाची होती. आरोपी सय्यद वाकर यास पकडल्यानंतर त्याची अंगझडती घेण्यात आली होती. त्या झडतीत एक हजार नऊशे पाच रुपयांच्या नोटा सापडल्याचे पूर्वी सांगितलेच आहे. त्यापैकी एकोणीस नोटा शंभराच्या होत्या. त्यापैकी एका नोटेवरच्या वॉटरमार्कवर चुनावालांची संक्षिप्त सही होती. ती श्रीमती बतुल यांनी ओळखली. कार मार्टमध्ये श्री. चुनावालांच्यावरोवर काम करीत असताना त्यांच्या कामाच्या कांही लकवी त्यांना ठाऊक होत्या. नोटांची वंडले बांधून आलेली असली की त्या नोटा मोजून शेवटच्या नोटेवरील वॉटरमार्कवर संक्षिप्त सही करण्याची श्री. चुनावाला यांची पद्धत होती. या साक्षीस दुजोरा दिला कमलाकर मुजुमदार या साक्षीदाराने. तोही कारमार्टमध्ये नोकरी करीत असे.

श्रीमती बतुल यांना आब्वासअल्ली नांवाचे एक वंधु होते; त्यांची पत्नी श्रीमती खातुम आब्बासअल्ली हकीम यादेखील 'कार मार्ट'च्या एक डायरेक्टर होत्या. त्यांचे व चुनावाला कुटुंबाचे एकमेकांकडे जाणेयेणे वरेच होते. विशेषतः श्री. चुनावाला हे अनेकवेळेला श्रीमती खातुम यांच्याकडे जात. बहुधा दर रविवारी श्री. चुनावाला यांचे दुपारचे जेवण श्रीमती खातुम यांच्याकडे ठरलेलेच असे. वावीस ऑक्टोबरच्या रात्री, सुमारे सव्वादहाच्या सुमारास श्रीमती खातुम यांचे श्री. चुनावाला यांच्याशी टेलिफोनवर संभाषण झाले होते. एवढ्या मुद्यावावतच फिर्यादी पक्षाने त्यांची साक्ष काढलेली होती. वावीस ऑक्टोबर रोजी दुपारी श्री. चुनावाला यांनी श्रीमती खातुम यांना टेलीफोन करून आपण जेवायला येत असल्याची वर्दी दिली. ते एकटेच येणार होते. त्याप्रमाणे दीडपावणेदोन वाजता ते आले. जेवण झाल्यानंतर ते नमाज पढले. दुपारी दोघांनीही एकत्र चहा घेतला. सुमारे साडेचार वाजता ते उभयता गाडी घेऊन वाहेर पडले. काही किरकोळ कामे आटोपल्यानंतर त्यांनी श्रीमती खातुम यांना सायंकाळी साडेपाच वाजता भेंडीबाजारात सोडले. तेथून श्रीमती खातुम आपल्या आईकडे गेल्या. त्या रात्री दहा सव्वादहाच्या सुमारास त्या आपल्या घरी परतल्या. त्यांनी लागलीच श्री. चुनावाला यांना फोन करून आपण घरी परतल्याचे कळविले. श्री. चुनावाला आणि त्या एकत्र कुठेही गेलेले असले व श्रीमती खातुम एकटयाच घरी परतल्यानंतर त्या फोन करून श्री. चुनावाला यांना नेहमीच, आपण सुखरूप पोचल्याची वर्दी देत. त्यांनी सव्वादहा वाजता फोन केला तेव्हा आपण टेवलापाशी वसून दुसऱ्या दिवशीच्या इन्कमटॅक्सचे कागदपत्र चाळत वसलो असून रात्री वारा साडेवारापर्यंत काम करीत वसणार असल्याचे श्री. चुनावाला यांनी सांगितले.

श्रीमती खातुम यांची साक्ष केवळ एका या लहान घटनेपुरतीच महत्त्वाची होती. कारण त्या रात्री दहा सव्वादहापर्यंत तरी श्री. चुनावाला हे जिवंत होते ही गोष्ट त्यामुळे सिद्ध होत होती.

**खटला सेशन्सकडे वर्ग**

गुन्ह्याच्या चौकशीचे काम जानेवारी १९६८ च्या पहिल्या आठवड्यात संपले. दरम्यानच्या काळात इन्स्पेक्टर वाकाटकर आणि त्यांचे सहकारी यांनी अनेक लहानमोठ्या साक्षीदारांच्या जवान्या नोंदवून घेतल्या. पुष्कळ वारीक सारीक मुद्यांवरचा पुरावा त्यांनी निरलसपणे आणि चोखंदळपणे गोळा केला. पाच जानेवारीला आरोपींविरुद्ध आरोपपत्र (चार्जशीट) दाखल केले. खटल्याची प्राथमिक चौकशी प्रसिडेंसी मॅजिस्ट्रेट यांच्या कोर्टात होऊन एक फेब्रुवारीला खटला सेशनकमिट करण्यात आला.

मुंबईचे सत्र न्यायाधीश श्री. पी. सी. कापडिया यांच्यापुढे हा खटला एक जुलै १९६८ रोजी सुनावणीस निघाला. आरोपींवर एकूण सात आरोप ठेवण्यात आले. पहिला आरोप खून करणे व संपत्तीची जवरी चोरी करणे या गुन्ह्यांचा कट केल्यावद्दल होता. चार आरोप चार व्यक्तींचे खून केल्यावद्दल होते, सहावा आरोप चुनावालांच्या संपत्तीची जवरी चोरी करणे व ती करताना प्राणघातक शस्त्रांचा वापर करणे यावावत होता; सातवा आरोप, उपरिनिर्दिष्ट गुन्हे करून त्या गुन्ह्यातील पुरावा नष्ट करण्याचा प्रयत्न केल्यावद्दल. हे सारे आरोप दोन्ही आरोपींनी नाकबूल केले. दोघांनीही आपापले वकील दिले होते. त्याप्रमाण तेही एक जुलै रोजी हजर होते. साक्षीपुरावा सुरू होण्यापूर्वी आरोपीच्या वकीलांनी एक तांत्रिक हरकतीचा मुद्दा सादर केला. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे हा खटला ज्यूरीपुढे चालणे आवश्यक होते. वास्तविक महाराष्ट्र राज्यात ज्यूरीची पद्धत केव्हाच वंद झाली होती. जुन्या मुंबई राज्यात त्याप्रमाण क्रिमिनल प्रोसिजर कोडामध्ये आवश्यक ती दुरुस्तीही केली होती. आरोपींच्या वकिलांनी एक भला मोठा लांवलचक अर्ज करून, राज्यसरकारची ही दुरुस्तीच मुळी घटनावाह्य आहे असा मुद्दा मांडला. या मुद्यावरच वरेच कालहरण झाले. पण न्यायमूर्तींनी त्यांचा अर्ज तीन जुलैला फेटाळून लावला. त्या हुकुमाविरुद्ध उच्च न्यायालयांत दाद मागण्यासाठी मुदत हवी म्हणून पुन: आरोपींनी अर्ज केला. तोहि फेटाळण्यात आला. त्यानंतर साक्षीदारांच्या

पुराव्याचे काम सुरू झाले; पण आरोपींचे वर्तन फारच विचित्र. ते अधूनमधून आरडाओरडा करीत. एकदा त्यांनी आपले वकील सरकारी वकीलांशी बोलत असल्याचे पाहिले. त्यांचे माथेच भडकले! त्यांनी लागलीच पाच जुलै रोजी अर्ज देऊन आपल्या दोन्ही वकीलांनी आपला खटला चालवू नये अशी कोर्टाकडे मागणी केली. वास्तविक दोन्ही वकिलांनी मेहेनत घेऊन कामास सुरुवात केली होती. वकीलांनी कामापुरतेच आपापल्या पक्षातर्फे भांडायचे असते. इतरवेळी काही ते एकमेकांचे शत्रू नसतात हे सामान्य माणसाला-देखील कळते. पण आरोपींची खोवडीच उलटी होती. त्यांच्या अर्जातील त्यांनी आपल्या वकीलांवर केलेल्या वेजबाबदार, असत्य आरोपांचा विचार न करताच न्यायमूर्तींनी त्यांना कामातून मुक्त केले. पुढे, आपल्याला सरकारतर्फे वकील मिळावा अशी आरोपींनी मागणी केली. कोर्टाने श्री. गाडगीळ वकील यांची नियुक्ती केली. पण आरोपी त्यांना खटल्याची काही माहितीच देईनात. शेवटी कंटाळून श्री. गाडगीळ यांनी आपले नांव काढून घेतले. आरोपींचे पुष्कळशे अर्ज नामंजूर झाल्याने कोर्टाचे आपल्याविषयीचे मत पूर्वग्रहाने कलुषित झाले आहे तेव्हा हा खटला दुसऱ्या कोर्टापुढे चालावा असा आणखी एक अर्ज केला. तोही फेटाळण्यात आला. त्यावर त्यांनी उच्च न्यायालयाकडे रिव्हीजन अर्ज केला. तोही फेटाळण्यात आला.

शेवटी सय्यद वाकरने श्री. पन्ना यांना आपले वकील नेमले व अझीझ यास सरकारी मदतीने श्री. करमरकर यांना वकील म्हणून नेमले. खटल्याचे काम सुरळीत चालू होण्यासाठी ऑगस्ट महिन्याची वारा तारीख उजाडली! आरोपींनी हे कालहरणाचे काम बुध्दयाच चालविले होते कीं काय कोणास ठाऊक? आपल्या पसंतीचा वकील मिळण्यासाठी एक महिन्याची मुदत पाहिजे असे त्यांनी आपल्या अर्जात म्हटले होते. ही विनंती मंजूर झाली नाही तर महात्मा गांधींनी दाखविलेल्या मार्गाने आम्ही जाऊ, या खटल्याशी आमचा कसलाही संबंध राहणार नाही अशी उपरोधात्मक धमकीही दिली होती. महात्मा गांधींचे नाव आरोपींच्या तोंडी येणे हा वदतोव्याघाताचाच प्रकार म्हणावयाचा! आरोपींच्या मर्कटलीला येथवरच थांबल्या नाहीत. त्यांनी सुप्रीम कोर्टापर्यंत धाव घेतली. सुप्रीम कोर्टात जाण्यासाठी त्यांना काही खर्च करण्याची जरूर नव्हतीच. आरोपी कैदेत असताना त्याला कोठल्याही अर्जाला कोर्ट फीचे तिकीट लावावे लागत नाही. जेलरकरवी एक अर्ज पाठवून दिला की भागते. सुप्रीम कोर्टानेही त्यांचा अर्ज फेटाळला.

दोन सप्टेंबर रोजी त्यांनी पुनः कोर्टाला एक अर्ज केला. 'हा खटला दुसऱ्या कोर्टात वर्ग व्हावा म्हणून आपण हायकोर्टात अर्ज केला असून या खटल्याची सुनावणी तोपर्यंत तहकूब करावी' अशी विनंती त्यांनी केली होती. एव्हांना फिर्यादी पक्षातर्फे पोलीस अधिकाऱ्यांव्यतिरिक्त सर्वांच्या साक्षी झाल्या होत्या. कोर्टाने व नंतर हायकोर्टाने हाही अर्ज नामंजूर केला. सर्वात कळस केला तो २६ सप्टेंबरच्या अर्जाने. यावेळेस पुरावा नोंदविण्याचे काम संपून सरकारतर्फे युक्तिवादाचे भाषण पुरे झालेले होते. आरोपींच्या वकिलांचे भाषण सुरू झाले होते. मध्येच आरोपींनी आणखीन् एक अर्ज पेश केला. त्यात त्यांनी म्हटले होते की आपल्याला शिक्षा व्हावी म्हणून न्यायमूर्तींवर दडपण आणण्यात येत आहे आणि त्याकामी न्यायमूर्तींना पाऊण ते एक लाखपर्यंत रक्कम मिळावयाची आहे. आरोपींच्या विकृत मनोवृत्तीने कमाल मर्यादा गाठली होती!

बारा ऑगस्टपासून मात्र खटल्याचे काम सुरळीतपणे चालले. तीनचार साक्षीदारांच्या साक्षी पूर्वीच होऊन गेल्या होत्या. नव्याने नेमलेल्या वकिलांनी त्या साक्षीदारांची आपणास पुनः उलटतपासणी करावयाची आहे अशी मागणी केल्यावरून त्यांना पुनः बोलावण्यात आले आणि त्यांची उलटतपासणी घेण्यात आली.

चारही मृत व्यक्तींच्या शवाची उत्तर तपासणी डॉ. मुजुमदार यांनी केली होती. त्यांनी कोर्टापुढे साक्ष देताना, शवचिकित्सेच्या वेळी त्यांनी केलेल्या नोंदी कोर्टापुढे हजर केल्या. त्यांच्या परीक्षेप्रमाणे त्यांना श्री. चुनावाला यांच्या शरीरावर चार जखमा आढळल्या. या चारीही जखमा त्यांच्या मृत्यूला कारणीभूत होत्या. जखमा तीक्ष्ण धारेच्या शस्त्राने केल्या गेल्या होत्या. आणि त्यांच्या मतानुसार श्री. चुनावाला, या चार प्राणघातकी जखमा झाल्यानंतर दोन तीन मिनिटातच मृत्यु पावले असावेत. त्यांच्या जठरात अर्धवट पचलेला असा सहा ते आठ औंस अन्नांश मिळाला होता. त्यावरून जेवण झाल्यानंतर सुमारे २।३ तासातच ते मृत्यू पावले असावेत असा त्यांचा तर्क होता. श्रीमती चुनावाला यांच्या अंगावर तीक्ष्ण हत्याराच्या चार जखमा आढळल्या. त्यापैकी एक छातीच्या उजव्या बाजूस होती, दोन छातीच्या डाव्या बाजूस होत्या व एक उजव्या मांडीवर होती. याही जखमा त्यांच्या मृत्यूला कारणीभूत होणाऱ्या होत्या. मृत्यू आला असताना त्यांचे डोळे अर्धवट उघडे होते. त्यावरून त्यांचा मृत्यू तात्काळ झाला असल्याचे निदान होत








होते. त्यांच्याही पोटात अर्धवट पचलेला अन्नांश मिळाला होता. तेव्हा त्यांचाही मृत्यू भोजनानंतर २।३ तासातच झाला असला पाहिजे असे त्यांनी सांगितले. चुनावाला यांचा पाच वर्षाचा नातू शहाजीत खान याच्यावर तीक्ष्ण पात्याच्या हत्याराच्या एकूण तेरा जखमा होत्या. त्याचा गळा आरपार कापलेला होता. दहा जखमा पाठीवर होत्या. एक पोटावर होती. त्या जखमेतून आतडी बाहेर येऊन लोंबत होती. एक जखम ओटीपोटावर होती. या वारांमुळे आतील पुष्कळसे भाग फाटून गेले होते. त्याचाही मृत्यू तडकाफडकीच झाला असावा असा डॉक्टरांचा तर्क होता. अॅनी फर्नांडीसच्या शरीरावर पंधरा जखमा होत्या. त्यापैकी एक डोक्यावर, पाच मानेवर, दोन छातीवर व एक पोटावर अशा होत्या. याही प्राणघातक होत्या. तिच्याही पोटात अन्नांश मिळाला होता. जखमा होताच थोडयाच अवकाशात तिला मृत्यू आला असला पाहिजे असे मत डॉक्टर मुजुमदार यांनी व्यक्त केले.

श्री. चुनावाला आणि अॅनी फर्नांडीस यांच्या शरीरावरील जखमांमध्ये एक साम्य होते. या जखमांची रुंदी सुमारे एक सेंटिमीटर होती. त्यामुळ या दोघांनाही मारताना एकच शस्त्र वापरले असण्याचा संभव होता. उलट शहाजीत खान आणि श्रीमती चुनावाला यांच्या जखमांची रुंदी अर्धा सेंटिमीटर होती. या दोघांना दुसऱ्या शस्त्राने मारले असण्याची शक्यता होती. चुनावालांच्या घरी पंचनामा करतेवेळी मागच्या ओसरीवर ठेवलेल्या मटणाच्या पेटीखाली एक सुरा पोलीसांना आढळला होता हे पूर्वी सांगितलेच आहे. त्या सुऱ्याचे पाते अर्धा सेंटिमीटर जाडीचे होते. त्यावर रक्ताचे डागही होते. हा सुरा डॉ. मुजुमदार यांना दाखवताच, श्रीमती चुनावाला आणि शहाजीत खान यांच्या शरीरावरील जखमा या सुऱ्याने होण शक्य आहे असे मत त्यांनी व्यक्त केले.

डॉ. मुजुमदारांची उलटतपासणी बरीच लांबलचक झाली. पण त्यातून काहीही निष्पन्न झाले नाही. डॉ. मुजुमदारांच्या साक्षीवरून ज्या प्राणघातक जखमांमुळे त्या चारीही व्यक्तींचा मृत्यू झाला ही गोष्ट तर सिद्धच होत होती. शिवाय तिघांच्या पोटात अन्नांश मिळाल्याने गुन्हा केव्हा घडला असावा याची वेळही नक्की करता येत होती. चुनावालांचे रात्रीचे भोजन सुमारे ९-९॥ वाजता झाले होते. याबाबत मिस्त्री आचाऱ्याची साक्ष होतीच. सुमारे सव्वादहा वाजता श्री. चुनावाला हे श्रीमती खातुम यांच्याशी टेलिफोनवर बोलले होते. त्याच रात्री ११-११। च्या सुमारास श्री. ओबवजी शहा आणि श्री. दळवी यांना आपापल्या घरांतून कसल्यातरी आर्त किंकाळ्या ऐकल्या होत्या. या सर्व गोष्टींचा साकल्याने विचार करता त्या चारही व्यक्तींचा मृत्यू बावीस ऑक्टोबर रोजी रात्री १०॥ ते ११॥ च्या दरम्यान झाला असला पाहिजे हे सिद्ध होत होते.

या खटल्यात गुन्हा घडताना प्रत्यक्ष पाहणारे साक्षीदार ('साक्षी' याचाच अर्थ प्रत्यक्ष पाहणारा असा आहे ! ) नसल्याने, केवळ परिस्थितीजन्य पुराव्यावरच गुन्ह्याची शाबिती अवलंबून होती. तेव्हा कोठल्याही प्रकारचे न्यून या पुराव्यात ठेवावयाचे नाही याचा जणू चंगच पोलीस अधिकाऱ्यांनी बांधला होता. त्यांनी ऑलीव्हग्रीन पँटच्या कापडातील अस्तराचा तुकडा व डायनिंग वॅगनखाली असलेला तुकडा केमिकल अॅनलायझरकडे तपासणीसाठी व तुलनेसाठी पाठवला. तो पुरुषोत्तम पांडुरंग पै यांनी तपासला. श्री. पै हे महाराष्ट्र सरकारच्या फोरेंझिक सायन्स लॅबोरेटरीत वरिष्ठ शास्त्रज्ञ म्हणून काम करीत. त्यांनी दोन्ही तुकडयांचे सूक्ष्म निरीक्षण केले. ओत, प्रोत, रंग, वीण आणि नमुना (Pattern) याबाबतच्या साऱ्या चाचण्या घेतल्या असता ते दोन्ही तुकडे एकाच कापडाचे असल्याचे मत व्यक्त केले. तसेच त्या ऑलीव्हग्रीन रंगाच्या पँटीला खिशासाठीही तेच कापड वापरलेले होते. त्या तुकडयावरील शिवण आणि पँटवरील शिवण सारखीच होती व एकच प्रकारचा दोरा वापरला होता. त्यावरूनही तो पांढरा तुकडा त्या पँटचाच आहे हे त्यांनी आपल्या साक्षीत सांगितले.

चार मयतांपैकी दोघांचे खून एकाच प्रकारच्या शस्त्राने झाले होते व दुसऱ्या दोघांचे खून दुसऱ्या प्रकारच्या एकाच शस्त्राने झाले असावेत असे मत डॉक्टर मुजुमदार यांनी आपल्या साक्षीत व्यक्त केले होते. त्यापैकी एक सुरा चुनावालांच्या घरातच मिळाला होता. तो गुन्ह्याच्या कामी वापरला गेला असल्याची साक्षी त्या सुऱ्यावरील रक्ताचे डाग देतच होते. स्वयंपाकघरात मटण चिरण्यासाठी हा सुरा वापरला जाई. मग सुऱ्यावरील तांबडे डाग कदाचित् मटणाचे असले तर ? पण या शंकेलाही जागा नव्हतीच. कारण बावीस ऑक्टोबरला स्वयंपाक करते वेळी या सुऱ्याचा वापर आपण केला नव्हता असे मिस्त्री आचाऱ्याने उलटतपासणीत सांगितले होते. भोजनगृहात सापडलेला फळे कापण्याचा चाकू गुन्ह्याच्या कामी वापरलेला नव्हता हे उघड होते. श्री. चुनावाला आणि अॅनी फर्नांडीस यांच्यावर ज्या शस्त्राने वार झाले ते शस्त्र पोलीसांना त्यांच्या तपासात मिळालेच नाही. परंतु त्यासंबंधीचा एक विश्वसनीय पुरावा मात्र त्यांना मिळालेला होता. गुन्हा घडण्यापूर्वी काही दिवस आरोपी सय्यद बाकर हा एक चाकू आपल्या कंबरपट्ट्याला लटकावून हिंडत असताना दोन व्यक्तींनी पाहिले होते. या दोन व्यक्ती म्हणजे महंमद ईद्रस व बलदेवसिंग या होत. त्या दोघांच्याही साक्षी घेण्यात आल्या.

इथवर सांगितलेल्या हकीकतीमध्ये सय्यद बाकरचाच वृत्तांत सांगितला गेला. गुन्ह्यापूर्वी आणि गुन्ह्यानंतर त्याच्या ज्या हालचाली झाल्या त्यासंबंधी पोलीसांनी जसा पुरावा गोळा केला होता त्याचप्रमाणे अझीझसंबंधीही गोळा केला होता. त्याच्या संबंधात मेजर मृणालकांती राजेंद्रमोहन दत्त, मेजर भास्करराव शिंदे आणि चित्तस्वामी यांच्या साक्षी झाल्या. आरोपी अझीझ हा मेजर दत्त यांचा ऑर्डर्ली म्हणून खडकी येथे काम करीत होता. तो सहा ऑक्टोबरपासून खडकीतून बेपत्ता असल्याचे मेजर दत्त आणि मेजर शिंदे

(पान ५६ वर पहा)



# सुप्रिया II



### कथासूत्र :

निसर्गाने सौंदर्याची खैरात केलेली तरुणी सुप्रिया–मॉडेलिंगचा व्यवसाय करीत असतानाच एका सामान्य शोफरच्या प्रेमात सापडली. शोफर राजेशने तिला लग्नाची वचने देऊन झुलवत ठेवले होते आणि तिचा तो उपभोग घेत होता. सुप्रियाची मैत्रिण मुमताज हिने तिला पिकनिकच्या नावाखाली लोणावळ्याला नेऊन एका मित्राच्या दिमतीला तिला दिले. तो मित्र एक पोलीस अधिकारी होता. त्याने राजेशचे लग्न झालेले असून त्याला दोन मुलेही आहेत अशी माहिती सुप्रियाला पुरविली. सुप्रियाची एक उत्तम गृहिणी होण्याची स्वप्ने धुळीला मिळाली आणि तिने चक्क वेश्या-व्यवसायच सुरू केला. एके दिवशी राजेशबरोबर त्याच्या मालकाच्या बंगल्यावर जाऊन तिने त्याचे लग्न झाल्याचे आणि त्याला दोन मुलेही असल्याचे आपणास समजले आहे याची त्याला जाणीव दिली आणि यापुढे त्याच्याबरोबर संबंध ठेवावयाचा नाही असे त्याला बजावून तिने त्याचा निरोप घेतला. जाताना तिने सहज म्हणून त्याच्या मालकिणीच्या शय्यागृहातून सोन्याची डबी आपल्या पर्समध्ये टाकून ती गेली. त्या डबीमुळे पुढे काय रामायण घडले ते पुढील प्रकरणांमधून वाचा.

लेखक व छायाचित्रकार

**पुरुषोत्तम बावकर**









अनुक्रमणिका

## [९]

आता माझं आयुष्य म्हणजे एक 'मेरी गो राउण्ड' झाला होता. माझ्याभोवती सारखी तीच तीच माणसं फिरत होती. माझे प्रियकर सर्व वयाचे होते. काही तरुण, काही मध्यमवयीन, तर काही अगदी म्हातारे, तोंडाचे बोळके झालेले. पण सारे एकाच माळेचे मणी. काही पुरुषांची ओळख, मुमताजने करून दिली होती, तर काहींना, मीच रस्त्यावर पकडले होते. काहीजण मला खरोखरच चांगले वागवत, तर काही विकत घेतलेले, एक कचकड्याचे खेळणे समजत.

सायंकाळी या तथाकथित प्रियकरांना भेटायचे, त्यांच्याबरोबर कॉफी प्यायची, स्नॅक्स् खायचे आणि शय्यासोबत करायची, असा दिनक्रमच होऊन गेला होता. कधी पहिलं गिऱ्हाईक लवकर गेलं आणि मूड असला किंवा पहिल्या गिऱ्हाईकापासून हवं तसं सुख मिळालं नाही की, मी दुसरं गिऱ्हाईक शोधण्यासाठी बाहेर पडे; पण मध्ये असे कित्येक दिवस जात की, मी घरातून बाहेरच पडत नसे. मी, आळशी बनत चालले होते. केव्हा केव्हातर, पैसे ठेवलेला डबा खाली झालेला पाहूनच मी बाहेर जात असे. अगदीच आळस आला, तर मुमताजकडून पैसे आणि तर कधी आईलाच उधार सामान आणायला पाठवी.

मला माझ्या या नव्या धंद्याचा बिलकूल कंटाळा येत नव्हता. उलट या धंद्याने, मला एक प्रकारचा आनंद मिळत होता. थोड्याच दिवसात माझी खात्री झाली; राजेशविषयी माझ्या मनात काही खास अनुराग नव्हता, तर सारेच पुरुष मला या ना त्या नात्याने आवडत. माझा धंदा करणाऱ्या इतर स्त्रियांना असंच वाटतं की केवळ माझ्याच बाबतीत हे घडत होतं हे मात्र मला सांगता येणार नाही. पण प्रत्येक पुरुषाबरोबर झोपताना मला एक प्रकारची उत्सुकताच आणि हुरहूर वाटत असे.

मला नुकतेच तारुण्यात प्रवेश केलेली, उंच, बारीक शरीरयष्टीची मुलं, त्यांचा लाजाळूपणा, त्यांनी केलेले भावनात्मक इशारे, त्यांनी वापरलेले उत्तेजक शब्द, त्यांच्या ओठातला आणि केसातला थंडपणा मला आवडत असे. ऐन तारुण्यात असलेल्या पुरुषाचे भरलेले बाहू, रुबाबदार रुंद छाती, आणि पोटऱ्यांचा मला मोह होई.

म्हातारे पुरुष पण मला आवडत. स्त्रियांप्रमाणे म्हाताऱ्या माणसाच्या शरीरात काही विशेष फरक पडत नाही. कारण त्या वयातही ते तारुण्यातील गोडी चाखताना दिसतात. दररोज नवीन पुरुष मी बदलत असल्याने, एका कटाक्षातच त्यांच्यातले गुणदोष समजण्याइतकी मी आता अनुभवी झाले होते. मनुष्य शरीरापासून कधीही न संपणारा असा एक अतृप्त आनंद मिळत असतो. आपल्या दोघांच्या उथळ संबंधापलिकडे जाऊन, त्यांच्या शारीरिक सौंदर्यामागे असलेला अर्थ शोधून काढण्याचा मी मनातल्या मनात प्रयत्न करत असे. पण मला हे वाटणारे आकर्षण त्यांच्यापासून लपवून ठेवण्याची मी योग्य खबरदारी घेत असे कारण ते ह्याचा अर्थ माझं त्यांच्यावर प्रेम आहे, असं समजत. पण त्यांना वाटणाऱ्या ह्या प्रेमाशी माझ्या भावनांचा मुळीच संबंध नसे.

मी जे पैसे मिळवत होते, ते मला पुरेसे नव्हते. मुमताजसारखी मी पैशांना लोचट नसल्यामुळे आणि माझा सुस्वभावच थोडासा भिडस्त असल्यामुळे मी पहिल्यांदा पैसे मागत नसे आणि पैसे घेण्याची जेव्हा वेळ येई तेव्हा साऱ्या गोष्टी होऊन गेलेल्या असत. आणि मग मला वाटे, की ज्याच्यासाठी पैसे पडले नाहीत अशी मोफत चीज मी पुरुषांना पुरवत आहे; पण मग मग आलेल्या काही वाईट अनुभवाने मीसुद्धा पैशांसाठी घासाघीस करू लागले.

माझा हात थोडा खर्चिक होता, तेव्हा मला मिळालेले पैसे नेहमीच कमी पडत असत. माझ्या धंद्याला आवश्यक असणाऱ्या कपडे, स्नो–पावडर, सुवासिक तेले यांची खरेदी करण्यातच माझे सारे पैसे खर्च होत. पूर्वी जेव्हा मी मॉडेलिंगचा धंदा करत असे आणि आई कपडे शिवत असे, तेव्हा आम्हाला मिळणारे पैसे, आणि आता मिळणारे पैसे, यात काही विशेष फरक पडला होता असे नाही. आता फरक इतकाच होता, आता मला माझा माननुद्धा गहाण ठेवावा लागत होता. आईला मी शिवणकाम बंद करायला सांगितले होते. तिला जितके सुख देता येईल तितके देण्याचा मी प्रयत्न करीत असे. आईला आराम मिळू लागल्याने ती आता स्थूल झाली होती.

## सुप्रिया कादंबरीच्या निमित्ताने....

**'दीपावली'च्या जुलै १९७० च्या अंकात 'सुप्रिया' कादंबरीची पहिली दोन प्रकरणे प्रसिद्ध झाली त्यावेळी ही कादंबरी म्हणजे सुप्रसिद्ध इतालियन लेखक अल्बर्तो मोराव्हिया याच्या 'दी वुमन ऑफ रोम' या कादंबरीचा मराठी आविष्कार आहे हे मुद्दामच प्रसिद्ध केले नव्हते. त्यातील हेतू असा होता की ज्या वाचकांनी मूळ कादंबरी–अर्थात तिचे इंग्रजी रूपांतर–वाचलेली नाही त्यांनी निर्भेळ मनाने या कादंबरीचा आनंद लुटावा. तथापि आमच्या काही वाचकांना कादंबरी पूर्ण होईपर्यंत धीर धरणे अशक्य झाले आणि त्यांनी 'ही कादंबरी रुपांतरित आहे' अशी --आम्हाला पूर्वीच माहिती असलेली–वार्ता दिली. ऑगस्ट १९७० च्या अंकात अशा वाचकांनी थोडा धीर धरावा असेही आम्ही अग्रलेखातून सूचित केले होते; पण तरीही काही वाचकांनी पुन्हा तीच वार्ता आम्हास कळविली आहे. या कादंबरीचे हिंदीतही रूपांतर झाले आहे.**

**मूळ कादंबरीकार मोराव्हिया यांचे ऋण कादंबरी पूर्ण केल्यानंतरच मान्य करावयाचे असे लेखक श्री. बावकर यांनी ठरविले होते आणि म्हणूनच आम्ही हा मजकूर प्रसिद्ध करीत आहोत. ही कादंबरी रूपांतरित असल्याची वस्तुस्थिती लपविण्याचा लेखकाचा (आणि आमचाही) हेतू नव्हता. तरीहो ज्यांनी याबाबतीत आम्हांस पत्रे लिहिली त्यांचे आम्ही आभारी आहोत.**

**– संपादक**








अनुक्रमणिका

राजेशच्या मालकिणीच्या घरी राजेशबरोबर घालवलेल्या दिवसा-नंतर बरोबर दहा दिवसांनी सकाळीच राजेश माझ्या घरी आला. मी झोपलेच होते. आई मला उठवायला आली ती घसा बसलेल्या आवाजात म्हणाली,

"राजेश आलाय."

"येऊ दे त्याला आत" मी म्हणाले.

राजेश आत आला तेव्हा तो खूप घाबरलेला होता.

"त्या दिवशी तू माझ्या मालकिणीच्या खोलीतून एखादी वस्तू उचललीस काय ?"

चेहऱ्यावर कसलेच हावभाव न दाखवता म्हणाले, "कां ?"

"अत्यंत किंमती अशी पावडरची सोन्याची डबी हरवली आहे. मालकिणीने घर अगदी डोक्यावर घेतलं आहे. त्यावेळी घर माझ्या ताब्यात असल्याने सारे माझा संशय घेतायत्. नशिब माझं, चोरीची ही गोष्ट तिच्या काल परवाच लक्षात आली. मधल्या काळात, मोलकरीणसुद्धा ती चोरणे शक्य आहे म्हणून ठीक. नाहीतर माझी नोकरीसुद्धा गेली असती."

कुणातरी निरपराध माणसाला त्रास व्हायचा म्हणून मला भीती वाटली.

"त्यांनी मोलकरणीला काही त्रास नाही ना दिला ?"

"नाही पण पोलिसांनी आम्हाला खूप सतावलं."

काही वेळ गप्प राहिले. आणि म्हणाले, "मी घेतली ती डबी !"

तो माझ्याकडे पहात राहिला. "तू घेतलीस ! सांगायला तुला काही वाटत नाही ?"

"तुला सांगायला काय हरकत आहे ? "

"या उचलण्याला चोरी म्हणतात, तुला माहीत आहे ना !"

"होय."

त्याने माझ्याकडे पाहिले, आणि क्षणातच तो रागावला. कदाचित् पुढे होणाऱ्या परिणामाना तो घाबरला असेल. मी ह्या साऱ्या गोष्टीची जबाबदारी त्याच्यावर ढकलीन असे त्याला वाटलं असावं.

"चोरी करण्यासाठीच तू माझ्या मालकिणीच्या घरात शिरली होतीस. तरी बरं झालं, अशा चोर मुलीशी माझं लग्न झालं नाही."



मला त्याचा राग आला; पण तो मनातल्या मनात गिळला. "राजेश रागवतोस कशाला, तुझ्यावर त्यांनी काही आळ घातला नाही. आता तुझ्या मालकिणीकडे असे कितीतरी डबे असतील."

"पण तू चोरी कां केलीस ?"

"मला वाटलं म्हणून."

"हे काही उत्तर नव्हे."

"तुला खरंच जर ऐकून घ्यावयाची इच्छा असेल तर ऐक. मी काही ती मला हवी म्हणून चोरली नाही तर सहज उचलावी अशी मला इच्छा झाली म्हणून आणि आता मला तशी इच्छा झाली तर पुन्हा सुद्धा चोरेन."

"पण अशाने तुला काय मिळणार आहे ?"

त्याला मी पुढे बोलू दिले नाही. "रस्त्यावरच्या माणसाना मी घरी घेऊन येते ते मला पैसे देतात. हे जर मी करू शकते तर, चोरी सुद्धा करीन."

माझ्या म्हणण्याचा रोख त्याच्या ध्यानात आला. "तू चोरी सुद्धा करशील ? पण ते ठीक आहे. मी जर तुझ्याशी लग्न केलं असतं तर त्यांनी मलाच पकडलं असतं."

"तुझं लग्न झालंय, तुला एक मुलगी आहे. हे सारं मला समज-लंय. म्हणूनच मी चोरी केली.

"तू मला कशाला दोष देतेस ? इच्छा असल्याशिवाय वेश्या आणि चोर होता येत नाही."

"पण माझी इच्छा नसतानाही झाले. कारण तू मला तशी संधी दिलीस."

माझ्यावर कशाचाच परिणाम होत नाही हे पाहून तो म्हणाला, "तू काय करावं आणि काय करू नयेस-त्याच्याशी मला कर्तव्य नाही. ती डबी मला परत दे. नाहीतर माझी नोकरी जाईल. ती डबी बागेत सापडल्याचं मी सांगेन.

"त्या ड्रावरमध्ये आहे ती घे."

त्याने डबी घेतली आणि माझ्याकडे पाहिले. तो शरमला होता.

"तू गाडी आणली आहेस ?"

"होय."

"पण आता उशीर झाला आहे. तू थांबू नकोस. आपण पुन्हा केव्हातरी बोलू."

"तू माझ्यावर रागावली आहेस !"

"नाही."

"नाही कशी. तू रागावली आहेस."

"नाही, बिलकुल नाही."

"त्याने एक निःश्वास सोडला. तो खाली वाकला आणि मी त्याला चुंबन घेऊ दिले.

"तू मला फोन करशील !" त्याने दरवाज्याकडे जाताना विचारले.

"होय."








आणि अशा रीतीने, राजेशला माझ्या नव्या आयुष्याची माहिती झाली आणि त्यानंतर आम्ही जेव्हा पुन्हा भेटलो तेव्हा सोन्याची डबी किंवा माझा नवा धंदा यावद्दल, त्याने काहीच विषय काढला नाही.

राजेशला माझ्या नव्या धंद्याविषयी काही वाटलं नाही. त्याचा स्वभाव दुष्ट होता. मी सर्व बाहेरख्यालीपणा करून जरी, त्याची मैत्रिण राहिले असते, तरी त्याला ते हवे होते. त्याच्या फसवणुकीनेच मला हा नवा व्यवसाय पत्करावा लागला होता. आपल्याकडे असलेला पैसा, स्त्री किंवा आपला स्वतःचा जीव वाचविण्यासाठी, आपला दर्जा, इज्जत गेली तरी काही लोकांना परवडते. त्यातलाच राजेश होता.

राजेशनंतर खऱ्या अर्थाने, माझ्या आयुष्यात आलेला दुसरा पुरुष म्हणजे, राम म्हात्रे. मुमताज त्याला अधुनमधून भेटत होती आणि ती त्याला माझ्याविषयी सांगण्याची संधी शोधत होती. एक दिवस ती मला म्हणाली,

"राम म्हात्रे तुला भेटू इच्छितो."

"तुला माझा होकारात्मक निरोप त्याला द्यायचा आहे का?"

"होय."

"मग त्याला सांग, इतरांना मी ज्याप्रमाणे भेटते, त्याप्रमाणे त्यालाही मी मधुनमधून भेटत जाईन."

माझं हे उत्तर ऐकून मुमताजला आश्चर्य वाटलं. तिला वाटलं होतं, मी राम म्हात्रेचा द्वेष करते. आणि त्याला भेटण्याची माझी इच्छा नाही. पण तिला माहीत नव्हतं की एव्हाना, मी द्वेष, प्रेम सारं विसरले होते. माझ्या संवेदना मेल्या होत्या.

ज्या हॉटेलमध्ये मी मनमोहनला भेटले होते, त्याच हॉटेलात, मी रामला भेटले. मला पाहताच त्याचा चेहरा साफ पडला. मुमताजने सांगितल्याप्रमाणे, खरंच तो माझ्यावर प्रेम करत होता.

इतर पुरुषांपेक्षा राम म्हात्रे खरंच वेगळा होता. आम्ही जेवण घेतल्यावर त्याच्या घरी गेलो. घरी जाताच त्याच्या आणि माझ्या लोणावळ्याला जाताना झालेल्या भेटीनंतर घडलेला वृत्तांत सांगायची त्याने विनवणी केली.

"पण तुला त्यापासून काय मिळणार आहे?"

"पण असा तुला काही त्रास होणार आहे का ते सांगताना! माझा विचार न करतानाच सांगत जा."

त्याला मी सारा वृत्तांत सांगितला. मुमताजने, मनमोहनची कशी ओळख करून दिली, राजेशशी झालेले भांडण सारे काही मी त्याला सांगितले. पण पावडरच्या डबीचा मी उल्लेख केला नाही. कारण तो पोलिसातला होता. माझी सारी हकिगत जेव्हा संपली तेव्हा तो दुःखी होऊन म्हणाला, "हे सारं माझ्यामुळेच झालं."

"नाही. नाही, तुझा काहीच दोष नाही. कुणाचाच काही दोष नाही."

"नाही कसं, दोष माझाच आहे. मी तुझ्या आयुष्याचा नाश केला. त्या दिवशी मी लोणावळ्याला तसा वागलो नसतो, तर सर्व काही ठीक झाले असते."

"तुझा हा मोठेपणा आहे. खरा दोष राजेशचा आहे. त्याने जर मला धोका दिला नसता तर मी त्याच्याशी लग्न केले असते आणि मग हा प्रसंग ओढवलाच नसता.

राम मला जेव्हा जेव्हा भेटे, तेव्हा प्रत्येक वेळी, राजेशविषयी विचारी आणि मग माझं ऐकत असताना, त्याच्या चेहऱ्यावरचे भाव पालटत जात. माझ्यावर स्वामित्व गाजवत असताना, विकारवश मनाने, अनेक उत्तेजक शब्द तो पुन्हा पुन्हा उच्चारी. खोल गर्तेत रुतलेल्या एखाद्या स्त्रीलाही ते शब्द ऐकावयाची लाज वाटावी. तो मला एकदा म्हणाला होता, गुन्हेगाराकडून गुन्हा कबूल करून घेताना त्याला जसा एक प्रकारचा आसुरी आनंद वाटे, तसाच आनंद त्याला स्त्रीवर स्वामित्व गाजवताना मिळे. "स्त्री ही गुन्हेगार माणसाप्रमाणे आहे" तो म्हणत असे. "जोपर्यंत ती प्रतिकार करते तोपर्यंतच ती आपली मान उंच करू शकते. पण एकदा का ती तुमच्या ताब्यात आली, की तिला तुम्ही कशीही वापरा."

राम सुखी नव्हता. त्याचे दुःख कशात आहे याचा थांगपत्ता मला मात्र लागला नाही. तो अनेक वेळा माझी हकीगत ऐकत असताना गुडघ्यात मान खुपसून राही. आई लहान मुलाला थोपटते, त्याप्रमाणे, मी त्याच्या डोक्यावर थोपटी. तो केव्हा केव्हा रडत असे. मी रामवर केव्हाच प्रेम केलं नाही. पण मला अशा वेळी खूप वाईट वाटे. त्याची दया येई. पण त्याचं दुःख दूर करण्याचा मार्ग मला सापडला नव्हता. तो आपल्या बायकोचा द्वेष करी. मुलीवर त्याचे बिलकूल प्रेम नव्हते. त्याच्या आईवडिलांनी त्याला लहानपणी



इंडि-कॉंग्रेसचा लोकशाही कॅबेरे!!

खूप वाईट वागणूक दिली होती. त्याच्या पसंतीचा विचार न करताच त्याचे लग्न लावले होते. तो आपल्या नोकरीविषयी केव्हाच बोलत नसे. तो पोलिस खात्यातील राजकीय गुन्हेगार विभागाचा प्रमुख होता.

प्रत्येक दिवशी सायंकाळी भेटायची रामची खूप इच्छा होती; पण एकाच माणसाशी संबंध ठेवायचा नाही असे मी ठरवले होते. शिवाय त्याच्या निरर्थक बडबडीचा मला कंटाळा येई आणि म्हणून त्याला मी आठवड्यातून एकदा भेटत असे. त्याने मला त्याचा खाजगी टेलिफोन नंबर दिला होता. हा नंबर फक्त त्याच्या वरच्या अधिकाऱ्यांना माहीत होता. मी त्याला फोन केल्यावर तो माझाच फोन आहे असे त्याला कळे तेव्हा त्याचा आवाज मृदू होई. तो माझ्या मुठीत आला होता, माझा गुलाम झाला होता.

काही काही वेळा मला बाहेर पडायचा, नवं गिऱ्हाईक शोधून आणायचा कंटाळा येई. मग मी बिछान्यावर नुसती पडून राही. मग माझ्या आयुष्यातले प्रसंग आठवत. मी स्वतःशीच म्हणे, "मी अनोळखी माणसांना घरी घेऊन येते; आणि मग रात्रभर समझोता न घडणाऱ्या शत्रूप्रमाणे एकमेकाना घट्ट पकडून ठेवतो. कुस्ती खेळतो. शेवटी तो माणूस कागदाचे काही कपटे देतो. ते कपटे दुकानदाराला देऊन जीवनोपयोगी वस्तू आणतो. " असा विचार चालू असतानाच कुठेतरी आवाज होतो. आणि मी भानावर येते. माझ्या अस्तित्वाची मला जाणीव होते. केव्हा केव्हा मी देवाची प्रार्थना करू लागते, "देवा माझ्यावर दया कर." अशा कित्येक रात्री मी जागून काढी. पण माझ्यात काहीच फरक पडला नाही. मी तीच नित्याची नव्या माणसाच्या शोधात असलेली सुप्रियाच राहिले.

## [१०]

मैत्रीच्या नात्यापेक्षा मुमताजचं आणि माझं नातं धंद्याचं राहिलं होतं. फिरोजने जवळजवळ मुमताजला सोडलंच होतं. कारण हल्ली कित्येक दिवसात तो भेटला नव्हता.

एक दिवस रात्री आम्ही घरी जात असताना एक मोटर आमचा पाठलाग करीत असल्याचे दिसून आले. त्या मोटारीत दोन माणसे बसली होती. मी मुमताजला ते सांगितले. " तुला पाहिजे तर जा. मला झोप येते." मुमताजला स्वतःच्या खाण्याचा खर्च स्वतःच करावा लागला होता. कोणी बकरा मिळाला नव्हता. एव्हाना गाडी जवळ आली होती.

"तू आली नाहीस तर मी काही जाणार नाही." मी म्हणाले.

तिने विचार केला, "येऊ देत त्यांना आमच्या मागून. पुढच्या कोपऱ्यावर भेटू."

गाडीतून दिव्याचा झोत टाकला गेला. त्यामुळे डोळे दिपून गेले आणि आम्ही तेथे थांबलो.

"गाडीतून येणार का फिरायला?"

हे शब्द आम्ही अनेक वेळा ऐकले होते.

"ते सारं अवलंबून आहे......" मुमताज म्हणाली.

"कशावर अवलंबून आहे?"

"किती पैसे मिळतील त्यावर." मुमताज मोटरच्या दरवाजावर हात ठेवून म्हणाली. मुमताजने त्याला आमचा भाव सांगितला.

"तुम्ही फार महागड्या आहात. तो गोरटेला माणूस म्हणाला. "खूपच महागड्या."

त्याच्या दोस्ताने त्याला काहीतरी कानात सांगितले, तेव्हा तो म्हणाला,

"आत बसा."

मुमताज त्या गोरटेल्या माणसाबरोबर पुढे बसली आणि मी मागे बसले.

"कुठं जायचं?"

"सुप्रियाच्या घरी." मुमताजने पत्ता सांगितला.

माझा सोबती गप्प होता. मलाही अनोळखी माणसाबरोबर सहसा बोलायला आवडत नाही. दुसरी गोष्ट, ही माणसं स्वतःचं बोलण्यासाठी अधीर असतात. माझ्या साथीदाराचा चेहरा काळोखात दिसत नव्हता. मला वाटले, तो लाजला असणार. मुमताजची बडबड मात्र चालू होती.

"ही गाडी तुझी वाटतं!"

"हो. तुला आवडली?"

"हो. चांगली आहे; पण मला आपली फियाट आवडते. माझ्या प्रियकराकडे आहे." हे खरंच होतं. फिरोजकडे फियाट होती, पण खरं म्हटलं तर तो काही तिचा प्रियकर नव्हता.

तो माणूस हसत होता. "तुझ्या प्रियकराकडे फियाट आहे, आणि ती दोन पायावर चालते."

"तुला आम्ही कोण आहो असं वाटलं?" मुमताज रागाने म्हणाली.

"कोण आहात ते सांगा पाहू. मला उगाचच फांद्यात पडायचं नाही."

आपण कोणीतरी नर्तकी, टायपिस्ट, केव्हा चांगल्या घरची स्त्री आहो, असं रस्त्यावरच्या पुरुषाला सांगायची तिला सवय आहे; पण थोड्याच वेळात पैशासाठी वाचावाची करू लागली की तिचा पोल फुटतो.

"आम्ही 'हिलटॉप' हॉटेलातल्या नर्तकी आहोत." मुमताज रागातच म्हणाली. "आम्हाला वाटेल त्या माणसाबरोबर बाहेर जायची सवय नाही. आम्ही सहज म्हणून फिरायला चाललो होतो. खरं म्हणजे मला तुमची मागणी मान्य करायची नव्हती. पण माझी मैत्रिण म्हणाली, तुम्ही चांगले सज्जन दिसता. माझ्या प्रियकराला हे कळलं तर तो मला ठेवणार नाही."

"आम्ही सज्जन आहोत. पण तुम्ही मात्र स्ट्रीट वॉकर आहात." यावेळी माझा साथीदार, त्या गोरटेल्या माणसावर उखडला. "रमेश तू आता तुझं तोंड बंद कर बघू."








मुमताजला जोर चढला. "तू जे काही बोललास ते खरं नाही. तू हलकट माणूस आहेस, असंच मी समजते."

तो काही बोलला नाही. त्याने वळणावर गाडी थांबवली आणि मुमताजकडे वळून म्हणाला, "समज मी तुला गाडीतून घालवून द्यायचे ठरविले तर?

"प्रयत्न तर करून पहा." मुमताज सहसा कुणाला घाबरत नाही.

माझा शेजारी आता पुढं वाकला. तो रंगाने काळा होता. कपाळावर केस विखुरले होते. नाक सरळ होते. ओठ जाड होते. पण त्याची हुनवटी मात्र थोडीशी आत गेली होती. तो बारीक होता आणि त्याची गालफडे बसली होती. "तू गप्प बसायला काय घेशील?"

"पण तुला त्याच्याशी काय कर्तव्य?" मोटर चालवणाऱ्या गोरटेल्या माणसान विचारले.

"असलं कसलं हे तुझं वागणं; आपण त्यांना बोलावलं. त्या आमच्यावर विश्वास ठेवून आल्या आणि आपण त्यांचा अपमान करायचा?" आणि मुमताजकडे वळून म्हणाला, "त्याच्याकड लक्ष देऊ नकोस."

काही वेळ कुणीच काही बोललं नाही. मी माझ्या शेजाऱ्यावर आकर्षित झाले होते. त्याने मला कुरवाळावे आणि चुंबन घ्यावे असे मला सारखे वाटू लागले. मी माझा हात त्याच्या हातात दिला. मला वाटले तो दाबेल; पण तो उदासीन दिसला. मला कसेसेच वाटले. मला माझा हात मागे ओढायचा नव्हता. गाडी वळताना, माझा तोल गेला असे दाखवून माझे डोके मी त्याच्या अंगावर ठेवले. तो थरथरला; पण हलला नाही. मी माझे डोळे बंद केले; त्याने काही मला कुरवाळले नाही. थोड्या वेळाने मी त्याचे पकडलेले हात सोडून दिले आणि गाडी थांबली.

गोरटेला खाली उतरला. आम्ही पण उतरलो. मुमताज गोरटेल्याला घेऊन जिना चढू लागली. मुमताज त्याच्याहून उंच होती. तो तिच्या खांद्याला लागत होता.

आम्ही दुसऱ्या खोलीत गेलो. आम्हाला पाहून आई सैंपाकघरात गेली. मी दरवाजा बंद केला आणि कोचावर जाऊन बसले. माझ्या शेजारी बसून त्याने मला गोंजारावे असे वाटू लागले; पण खिशात हात घालून तो खोलीत येरझाऱ्या घालू लागला.

"माफ कर, माझ्याकडे फक्त एकच बेडरूम आहे."

तो स्तब्ध राहिला. "मी खोलीबद्दल तुला विचारलं का?" तो घुश्यात म्हणाला.

"नाही; पण मला तसं वाटलं पण तू माझ्या शेजारी का बसत नाहीस?"

तो माझ्याजवळ येऊन बसला.

"तुझं नाव काय?"

"सुप्रिया."

"माझं नाव रविकांत; त्याने माझा हात हातात घेतला. मी हसले.

"थोड्याच वेळात आपण . .

"हो."

"आणि समज माझी इच्छा नसली तर ?"

" तर नको."

मला वाटलं तो गमतीनं बोलतोय.

"मग ठीक माझी इच्छा नाही."

"वरं तर." त्याचा तो नकार अनपेक्षित असाच होता.

"तुझं मन दुखावलं तर नाही ना ? स्त्रीच्या इच्छेला नकार दिलेला त्यांना आवडत नाही."

"खरंच मी दुखावले नाही." माझे डोळे भरून आले. "तुझी जर इच्छा नसेल तर तुझ्या मित्राचं होईपर्यंत थांब आणि मग जा."

"मी तुझा वेळ फुकट घेतोय. तू दुसऱ्यावरोवर काही पैसे मिळवले असतेस."

मला वाटलं, त्याच्याकडे पैसे नसतील. "तुझ्याकडे पैसे नसतील तर काही हरकत नाही. मागाहून दे."

"तू खरंच चांगली मुलगी आहेस." त्याने पैसे टेवलावर ठेवले.

तो माझ्याजवळ येऊन वसला. मी माझा हात त्याच्या हातात देण्यासाठी पुढं केला. आम्ही क्षणभर एकमेकांकडे पाहिले. त्याने माझं वोट जोरात पिरगळलं.

"होय. तू मला दुखवलंस."

"माफ कर. आपण वाहेर जाऊ या !"

"कुठं जायचं ?"

"मला माहीत नाही; पण आपण गाडीतून जाऊ."

"नको. मी म्हणाले. राजेशवरोवर मी रात्री अपरात्री जाई याची मला आठवण झाली.

"मग कॅफेमध्ये जाऊ. इथं आजुवाजूला असेल एखादं."

"इथं नाही. थोडं दूर आहे."

आम्ही खाली आलो. जाताना काहीतरी गमतीचं वोलावं, म्हणून मी म्हणाले,

"तू मला पैसे दिल्याने माझ्याकडे केव्हाही येण्याचा तुला अधिकार प्राप्त झाला आहे."

"वरं."

थोडासा पाऊस पडला होता. त्यामुळे रस्त्यावर चिखल साचला होता. पाण्यात दिव्याचं प्रतिविंव पडलं होतं.

आम्ही कॅफेत गेलो. त्या कॅफेत पूर्वी केव्हा एकदा गेल्याचं मला आठवलं. होय, आई आणि राजेशवरोवर. आणि एका दारुड्या तरुणाने माझी मस्करी केली तेव्हा, राजेशने त्याला दम भरला होता.

आम्ही कॉफी मागवली.

त्याने ती गरम कॉफी एका दमात पिऊन टाकली.

"मला तुझा तो दोस्त प्रथम काही आवडला नाही.

"तो माझा दोस्त नव्हे ! आणि दुसरी गोष्ट म्हणजे तो आवडण्यासारखा मुळीच नाही." त्याच्या प्रत्येक शब्दात द्वेष भरला होता.

"तो वालपणीचा माझा शाळासोवती आहे. त्याच्याजवळ खूप पैसे आहेत. श्रीमंत आहे; पण काही वावतीत तो माझ्याहून चांगला आहे."

"कसा काय ?"

"कोणतीही गोष्ट तो मनापासून करतो." त्याचा आवाज मला फाटल्यासारखा वाटला. "मी मात्र कोणतीही गोष्ट मनापासून करत नाही. आजचंच घ्या ना. त्याने मला पिकअपसाठी येतोस का विचारलं. मी होय म्हटलं. तुला जेव्हा मी पाहिलं तेव्हा, तुझ्याशी शय्यासोवत करावी असंच मला वाटलं. पण तुझ्या घरी गेलो आणि माझी सारी इच्छा जिरून गेली."

"जिरून गेली ?" मी त्याच्याकडे आश्चर्याने पाहिलं.

"हो." त्यावेळी मला तू एक निर्जीव खेळणं वाटलं. कुणीही यावं आणि खेळावं असंच वाटलं. तुझ्यात जीव आहे की नाही हे पाहण्यासाठी मी तुझं वोट पिरगळलं."

"माझं वोट अजूनही दुखतंय."

त्याला मी समजू शकत होते. मला जरा वरं वाटलं. एकूण त्याला मी आवडले होते.

"तुला मी आवडले नाही असं दिसतंय."

"नाही. तसंच काही नाही. तुझ्या जागी दुसरं कोणी असतं तरी तसंच वाटलं असतं."

"अस्सं ! तू नपुसक तर नाहीस ना !"

"अरे देवा. छे. छे तसं काहीच नाही."

त्याच्या वरोवर प्रेम करावे; गोंजारावे असे सारखे मला वाटू लागले. त्याच्या नकारामुळ खरं सागायचं म्हणजे माझ्या अहंकाराला धक्का वसला. मी सुंदर आणि आकर्षक होते. माझी अभिलाषा करू नये, असं कोणतंही कारण माझ्यात नव्हतंच !

"चल ऊठ. आपण आता जाऊ या आणि .

"नाही ते अशक्य आहे."

" म्हणजे मी तुला विलकूल आकर्षित करू शकले नाही तर !"

"तसं नाही. मला समजून घेण्याचा प्रयत्न कर."

"मी तुला आकर्षित करू शकले नाही हेच खरं !" माझे हात त्याच्या तोंडावरून फिरू लागले. काही वेळ तो तसाच वसून राहिला. तो आता उत्तेजित झाला होता.

"तू काय करतेस ? इथं लोक आहेत."

"मला त्यांची पर्वा नाही." मी म्हणाले.

"चल आपण जाऊ." तो म्हणाला. त्याने विल दिलं आणि आम्ही वाहेर पडलो. तो वोलत होता. "हे असंच नेहमी होतं. मला अनेक गोष्टी करावयाच्या असतात. मी खूप परिश्रम घेतो. सारं काही





अनुक्रमणिका





एका चित्रांत नकली दागिने तर दुसऱ्यांत अस्सल जवाहिर. अस्सल कोणते ओळखा!

# 'अस्सल' आणि 'नक्कल' यातला फरक ओळखलात काय?

उत्तम मालाची नक्कल सर्रास केली जाते. पुष्कळदा हा नकली माल दिसण्यांत अस्सल दिसतो.

किर्लोस्कर ५ हॉर्स पॉवर-एव्ही १ डिझेल एंजिनांची नेहमी नक्कल केली जाते. रंग, आकार, मोजमापे इतकेच काय पण बाह्य स्वरूपाबाबत किर्लोस्कर एव्ही १ एंजिनांसारखीच दिसणारी बनावट एंजिनें स्वस्त मिळतात. परंतु विश्वसनीयता आणि उत्कृष्ट कार्यक्षमता याबाबतीत किर्लोस्कर एंजिनांची बरोबरी कोणतेही बनावट एंजिन करूं शकत नाहीं. साहजिकच किर्लोस्कर एंजिनें शेतकऱ्यांच्या विश्वासास पात्र ठरली आहेत व म्हणूनच किर्लोस्कर एंजिनांची नक्कल आता वाढत्या प्रमाणांत केली जात आहे.

किर्लोस्कर एव्ही—१ हे एक विविधोपयोगी सिंगल सिलिंडर डिझेल एंजिन आहे. ते शेतकी आणि विविध औद्योगिक कामकाजांसाठीं उपयुक्त ठरलें आहे. विश्वासपात्रता, काटकसर, टिकाऊपणा आणि सतत समाधानकारक काम देण्याचा गुण याबाबतीत ते अजोड आहे. किर्लोस्कर एंजिनांना विक्रीनंतरच्या तत्पर व उत्तम सेवेचे पाठबळ आहे.



TOM & BAY/KO-34/69 M

Kirloskar®

एव्ही १-५ हॉर्स पॉवर
डिझेल एंजिन

*किर्लोस्कर एव्ही-१ ५ हॉर्सपॉवर एंजिन खरेदी करा—*
*नकली आणि स्वस्त एंजिनावर भरंवसा ठेवू नका!*

**किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लिमिटेड**, एल्फिन्स्टन रोड, खडकी, पुणे-३ (भारत)

वरील ट्रेडमार्क किर्लोस्कर प्रोप्रायटरी लिमिटेड या कंपनीच्या मालकीचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क असून किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लिमिटेड ही कंपनी त्याचा वापर करणारी अधिकृत कंपनी म्हणून नोंदविलेली आहे.











करतो; पण मग शेवटच्या क्षणी मी हाय खातो. थंड होतो. दुःखी – कष्टी होतो. अन् मग काहीतरीच करतो, जसं तुझं वोट पिरगळलं."

तो बोलत होता. मी म्हणाले, "तू सारं काही मला सांगितलंस. पण माझ्याकडे थोडं तरी लक्ष दे. मी काय सांगते ते ऐक. तुला ज्याची इच्छा नाही ते सारं करायचं. त्याशिवाय माझं समाधान व्हायचं नाही."

तो काहीच वोलला नाही. मी माझा हात कमरेभोवती ठेवला आणि आम्ही चालू लागलो.

आमच्या घराच्या कोपऱ्याजवळ आलो. तेव्हा मी म्हटले, "मला चुंबन दे." तो वळला आणि मी त्याचे जवरदस्तीने चुंबन घेतले. त्याचे ओठ वंद होते. तो माझे चुंबन परत करील याची मला खात्री नव्हती. मी काही मनाला लावून घेतले नाही. त्याच्या गालांना ओठाला, माझी लिपस्टिक चिकटली होती.

मी हसू लागले.

"कां हसतेस ?"

"काही नाही. मी खूप आनंदात आहे." मी झटकन् त्याचे आणखीन एक चुंबन घेतले.

आम्ही घरी गेलो तेव्हा गाडी तिथे नव्हती.

"आता मला चालत जावं लागणार" रविकांत म्हणाला.

"तू इथंच झोप."

"नाही नाही. मी जातो."

मी घरात गेले. आत काळोख होता. खिडकीतून आलेला रस्त्यावरच्या दिव्याचा उजेड शिवण्याच्या मशीनवर पडला होता. आई झोपायला गेली होती. कदाचित् ती मुमताज आणि रमेशवरोवर वोललीसुद्धा असावी. मी दरवाजा वंद केला आणि आत गेले. रविकांत फेऱ्या मारत होता.

"मी गेलो तर वरे होईल."

मी न ऐकल्यासारखं केलं–

"तुला कशी वाटली ही खोली ?" मला विचारल्याशिवाय राहवेना. त्याने इकडे तिकडे पाहिले आणि कसासाच चेहरा केला.



मी त्याचा हात माझ्या हातात घेतला आणि अंथरुणावर वसवले. "आता सारं माझ्याकडं लागलं." तो म्हणाला. त्याने माझ्याकडे पाहिलं. मी त्याची टाय उतरवली. शर्ट काढला आणि हँगरला लावून टाकला. नंतर मी खाली वसले आणि त्याचे पाय मांडीवर घेऊन वूट उतरवले. मला ह्यावेळी देवापुढे वाकून नमस्कार केल्यासारखं वाटलं. असं वाटण्याची ही माझी पहिलीच वेळ होती. मी आनंदीत होते. सर्व पापापासून मुक्त असे खरे प्रेम ते हेच ह्याचा मला अनुभव आला.

मी जे जे केलं ते सारं त्यानं निमूटपणे करायला दिलं. त्यावेळी त्याचा तो गोंधळलेला चेहरा पाहून मी आनंदून गेले. तो अजून तसाच अंथरुणावर वसला होता. त्याला मी जे जे काही करावयाचे होते ते सारे वघायचे होते. त्याची ती स्थिर दृष्टी पाहून मला कसेसेच वाटले.

"तुला वरं नाही का वाटत ?" मी विचारलं.

"नाही. तसं काही नाही."

त्याचे ते थंडगार शरीर मला एखाद्या थंड तारेच्या तुकड्याप्रमाणे वाटले. माझा उन्माद गेला. मी त्याच्यापासून दूर झाले. मला दुःख झाले. माझ्या डोळ्यातून अश्रू ठिपकू लागले. मी माझा चेहरा झाकून घेतला. त्याला माझ्याशी एकरूप करून घेण्यात मी अपयशी झाले होते.

"तू नीघ." मी शेवटी म्हणाले.

"कां ?" त्याने गोंधळून माझ्याकडे पाहिलं. "काय झालं ?"

माझ्या हाताने चेहरा झाकत मी म्हणाले, "तू जाशील तर वरं होईल. तुला माझ्यावद्दल काहीच वाटत नाही . " मी वाक्य पूर्ण केले नाही. तो उठला. काहीच वोलला नाही. त्याने कपडे करायला सुरुवात केली. माझ्या पाठीत कुणी तरी खंजीर खुपसल्यासारखी कळ आली. मला कळ येत होती आणि त्याचा कपडे करत असतानाच आवाज मी एकत होते.

त्याने हळूहळू कपडे केले. कदाचित् मी त्याला वोलावीन असे त्याला क्षणभर वाटले असेल. त्याला तसेच तिथे थांववावे असे एक क्षणभर मला वाटले. मी माझ्या अंगावर पातळ चादर ओढून त्याच्या शजारी झोपले होते. नखरेवाजपणे मी पाय हलवून चादर खाली ढकलली. अशा तऱ्हेने मी माझे शरीर कुणालाच दाखवले नव्हते. माझ्या डोळ्यावर हात ठेवून मी तशीच स्तब्ध राहिले. त्याचे हात माझ्या खांद्यावर आहेत आणि ओठ ओठावर आहेत असे मला वाटले. पण त्याच वेळी दरवाजा वंद झाल्याचा आवाज मी एकला.

मी तशीच पडून राहिले. दुःखामुळे मला एक प्रकारची सुस्ती आली होती. मला झोप येऊ लागली. माझे डोळे जड झाले; पण मी मधच अचानक दचकून जागी झाले. तो निघून गेल्याचे दुःख मला झाले असले तरी त्याची स्मृती माझ्या मनात तरळत होती. मी पुन्हा झोपी गेले.

* * *






[ ११ ]

दुसऱ्या दिवशी सकाळी मला गळल्या-सारखे वाटू लागले. जणू काय मी एक महिन्याच्या दुखण्यातून उठले होते. नेहमी मी अंथरुणात लोळण्याचा प्रयत्न करते; पण जास्त वेळ अंथरुणात पडून रहायला मला आवडत नाही. त्या दिवशी मी उठायचा प्रयत्न केला पण मला उठवेना. आई दोन तीन वेळा उठवायला आली पण मी दाद दिली नाही. जेव्हा काळोख पडला तेव्हा मी अंगावरची चादर फेकली आणि उठले.

मी कपडे केले आणि आईला म्हणाले, "आपण आज फिरायला जाऊ." आई खूष झाली. तिच्या विषादपूर्ण अशा ओढलेल्या चेहऱ्यावर हास्य दिसलं.

मी आईला घेऊन गिरगावात आले आणि गर्दीतून दुकानांची सजावट पहात फिरू लागले. "आई, आता मी आपल्या घरी माणसं आणायची नाहीत असं ठरवलंय." प्रथमच मी आईबरोबर माझ्या धंद्याविषयी बोलत होते.

"तुला आवडेल तसं कर. तू सुखी रहावीस हीच माझी इच्छा."

"आता आपल्याला पुन्हा काटकसरीने रहावं लागणार आहे. पुढं काय व्यवसाय करायचा हे सुद्धा मी अजून ठरवलं नाही.

"मला काटकसरीने वागायची सवय आहे. पण तू काय करणार आहेस?"

"मी कदाचित् मॉडेलिंग करायला सुरुवात करीन." आई काचेच्या तावदानात ठेवलेल्या अनेक वस्तू पाहात होती. मी आपली विचार करीत होते. मला माझा हा वेश्या-व्यवसाय सोडायचा होता; पण दुसरे काहीच करण्यासारखे दिसत नव्हते. पुन्हा मॉडेलिंग करायला लागले असते तर मला साऱ्या आवडीनिवडी विसराव्या लागल्या असत्या. खरं म्हणजे मॉडेलिंग मला आवडत नव्हतं. आणि वेश्या-व्यवसायाचा कंटाळा आला होता. माझ्या मनात एकच तरुण भरला होता तो म्हणजे रविकान्त. मला त्याच्याशी लग्न करायची इच्छा होती. त्याच्यासाठी माझं सर्वस्व अर्पण करायची तयारी होती. आम्ही डिपार्टमेंटल स्टोअरमध्ये गेलो. तिथे केसात खोवायची सुंदर फुलं होती. आईला ती खूप आवडली. "तुला हवीत का?" मी आईला विचारले.

"हो. का?"

"मग तुला मिळतील ती" तुझी पर्स मला दे आणि माझी तुला घे.

तिला काही समजेना. मी तिची पर्स घेतली आणि माझी पर्स तिच्या हातात कोंबली. मी तिची पर्स उघडली आणि दोन बोटांनी तिचं तोंड पकडून स्टोअरमध्ये शिरले. आई माझ्या मागोमाग आली.

"मला केसात खोवायची फुलं हवीत." तिथल्या विक्रेतीला मी म्हणाले.

मी काउंटरला टेकून उभी राहिले. बॅग पोटाच्या समांतर पकडली आणि फुलं पाहू लागले. पाहता पाहता एक जोड पुढे आणून ठेवला. "मला याहून कमी किमतीची फुलं हवीत." विक्रेती नवीन फुलं आणायला गेली असता मी तो जोड हळूच पुढे ढकलला. तो बरोबर पर्समध्ये पडला. मी पर्सचं तोंड बंद केलं आणि पूर्वीप्रमाणे उभी राहिले.

विक्रेतीने नवी फुलं दाखविली. आईला ती पसंत आहेत का म्हणून विचारलं. तिचा चेहरा घाबरलेला होता. मी काय केलं ते तिने पाहिले होते.

ती फुलं पसंत नाहीत म्हणून आम्ही घाईघाईने बाहेर पडलो. आई वेड्या-सारखी माझ्या मागं पळत होती. तिची ती अवस्था पाहून मला हंसू आलं, तिची कीव आली; पण मलाच मी ती चोरी कां केली हेच समजेना. आणि ते समजून काही विशेष होणार असेही नव्हते. या अगोदर राजेशच्या मालकिणीची सोन्याची पावडरची डबी मी चोरली होती. त्यावेळी वाटलेले समाधान मला आज पुन्हा वाटले आणि लोक चोरी का करतात हे समजले.

आता कुठेतरी थांबायला हवं होतं. घाबरल्यामुळे आईला धाप लागली होती. आम्ही समोर दिसलेल्या उडप्याच्या हॉटेलात गेलो. आई नको नको म्हणत होती. तिला वाटलं, मी उगाचच पैसे खर्च करीन.

आम्हा दोघांसाठी मी वडासांबारची ऑर्डर दिली. गरमगरम वडासांबाराचा प्रत्येक चावा घेताना आई माझ्याकडे पहात होती. आईला वडासांबार खूप आवडलं होतं.

"आई आणखीन काहीतरी घे." मी म्हणाले.

ती नको नको म्हणत असताना, मी उत्तपा आणि मसाला डोसाची ऑर्डर दिली. वडासांबार, उत्तपा, मसाला डोसा आणि वरती गरम कॉफी पिऊन आईचा चेहरा उजळ झाला होता.

एक तरुण बाई दुकानात एका छोट्या मलीला घेऊन आली.

"मी लहान होते तेव्हा तू मला अशी हॉटेलात घेऊन आली नव्हतीस."












अनुक्रमणिका

"त्यावेळी कसं शक्य होतं मला ?" तिने मला विचारलं.

"आणि मी मात्र तुला इथं आणलं."

ती एक क्षणभर गप्प बसली आणि खिन्नपणे म्हणाली, "तू माझ्यावर उपकार केल्यासारखं बोलतेस. तोंडावर फेकतेस. मी इथे यायला तयार नव्हते. तूच मला बोलावून आणलंस."

मी तिचे हात हातात घेतले. "बिलकूल नाही. मी तुझ्या तोंडावर काही फेकत नाही. तुला इथं आणण्यात मला आनंद आहे."

तिने मान हलविली. ती काहीच बोलली नाही. आम्ही तिथे आणखीन् काही वेळ लोकांची धावपळ पहात बसून राहिलो. मी माझी पर्स उघडली. आणि एक सिगरेट पेटवली. माझ्यासारख्या बायका अशा सार्वजनिक ठिकाणी पुरुषांना आकर्षित करण्यासाठी सिगरेट ओढतात. पण यावेळी मला कुणाला गटवण्याचा विचार नव्हता. सिगरेटच्या धुराच्या वलयातून लोकांना पाहू लागले. माझ्या पाहण्यात काहीतरी चिथावणारे असले पाहिजे. कारण काउंटरजवळ उभा असलेला एक माणूस कॉफी पिण्याचे सोडून माझ्याकडे पाहत होता. तो चाळीशीच्या जवळपासचा, बुटका, कुरळे केस असलेला काळासा होता. तो इतका लठ्ठ होता की त्याची मान दिसत नव्हती. तो मला काही विशेष आवडला नाही; पण त्याचवेळी त्याला आकर्षित करण्याची सुप्त इच्छा माझ्या मनात निर्माण झाला आणि हे केव्हा तर माझा धंदा बंद करायचा विचार केल्याला पुरता तास सुद्धा झाला नव्हता. मी माझ्या भुवया वर उडवल्या आणि त्याच्याकडे अपेक्षेने पाहिले. मला वाटल्याप्रमाणे तो काळा निळा झाला. त्याने कप खाली ठेवला. काऊंटरवर पैसे दिले आणि दरवाज्यात उभं राहून त्याने खूण केली. मी त्याला नजरेनेच संमती दिली.

"मी तुला सोडून बाहेर जाणार आहे." मी आईला म्हणाले, "तू इथंच थांब."

"तू कुठं चाललीस ?"

"माझ्यासाठी एक माणूस बाहेर उभा आहे" मी उठत म्हणाले. "हे पैसे घे. बील देऊन घरी जा. तू तिथे पोचण्याआधीच मी आलेली असेन."

तिने भीतीने माझ्याकडे पाहिले. पण त्या दृष्टीत सुद्धा एक प्रकारची कठोरता होती. मी बाहेर पडले. तो माणूस माझी वाट पहात उभा होता. मी बाहेर येताच, माझा बाहू पकडत तो म्हणाला, "कुठं जायचं ?"

"माझ्या घरी."

काही तास यातना भोगल्यावर मी माझ्या नशिबाशी झगडण्याचा प्रयत्न सोडून दिला. जे घडणार आहे त्याचे मी स्वागत केले. जेव्हा माणूस प्रतिपक्षाचा पराभव करू शकत नाही तेव्हा त्याला त्याच्याशी जमवून घ्यावे लागते.

मी रविकांतचा विचार सोडून दिला होता. तो मला आवडत होता. मी त्याच्यावर प्रेम करत होते. आणि हा अनुभव मला नवा होता. कारण तो मला पुन्हा भेटेल किंवा नाही याची खात्री नव्हती. तो जर मला भेटला तर त्याला सारं काही सांगून टाकायचं, आणि लग्नाची याचना करायची असं ठरवलं होतं.

राजेशशी असलेले संबंध मी जवळजवळ तोडत आणले होते.आमच्या दोघांच्या संबंधातला तजेला संपत आला होता. एक दिवस राजेशने मला टेलिफोन केला आणि मला भेटायला बोलावले. राजेशला मी भेटले तेव्हा त्याच्या बरोबर एक माणूस होता. अंगाने पेहेलवानासारखा. त्याचे केस फार बारीक कापले होते. राजेशने त्याची माझ्याशी ओळख करून दिली.

"हा माझा दोस्त हरीराम."

हरीरामने माझा हात हातात घेतला. त्याबरोबर माझ्या हातात कळ आली.

"माझा हात तू दुखवलास." मी हसत म्हणाले.

तो बोलला नाही. त्याचे बारीक डोळे लुकलुकले. राजेशची त्याच्याशी असलेली दोस्ती मला काही विचित्र वाटत होती.

"हा एका ठोशातच माणसाला ठार मारू शकतो. माझा दोस्त आहे. भावासारखं प्रेम आहे आमचं दोघांचं." राजेश म्हणाला.

हरीरामने आपले खांदे हलवले. "दोस्त, भाऊ सब झूट है. आम्ही एकाच गॅरेजात काम करत होतो. इतकंच."

"तुला कोणाशी दोस्तीच ठेवायची नाही. तुला एकटं रहायला आवडतं. स्त्री पुरुष कोणीच तुला जवळ नको." हरीरामने राजेशकडे भेदक नजरेने पाहिले. "तुला असं सांगायची काय गरज ? मला आवडणाऱ्या कुणाही स्त्री पुरुषाबरोबर मी जातो." राजेशने आपली नजर दुसरीकडे वळवली.

"मी तुझी गंमत करत होतो. मात्र तुला मी कुणाबरोबर फिरताना पाहिलेले नाही."

"तू मूर्ख आहेस." हरीराम चिडून म्हणाला.

"तू मला मूर्ख म्हणतोस ?" राजेशने रुबाबात विचारले. मनातल्या मनात तो घाबरला होता.

"हो. मूर्खासारखं बरळू लागलास तर मी तुझा मेंदू बाहेर काढीन."

तो तसे करायला मागे पुढे पाहाणार नाही याची मला खात्री वाटली. "तुम्हा दोघांना मारामारी करायची असली तर मी नसताना करा." मी म्हणाले.

"मी तुला माझ्या तरुण मैत्रिणीची ओळख करून देत होतो, आणि तू तिला घाबरवलंस." राजेश म्हणाला.

"तू घाबरलीस वाटतं !" हरीरामने विचारलं.

"नाही; पण मला भांडण आवडत नाही." मी म्हणाले.

खूप वेळ कुणीही काही बोललं नाही. राजेश मान खाली घालून बसला होता.

"बरं मी जातो." हरीराम म्हणाला.

राजेशने त्याचे पाय पकडले. "आपली दोस्ती पूर्वीप्रमाणेच आहे." त्याने हात पुढे केला.

"हो." त्याने त्याचा हात न पकडता

माझा हात हातात घेतला. आणि तो निघून गेला.

"हरीराम तुझ्याशी ज्या रीतीने वागला, त्यावरून तुमची दोस्ती वाटत नाही." मी हसत म्हणाले.

"तो तसा वाईट नाही. त्याच्याशी मैत्री ठेवणे फायद्याचे आहे."

"कोणत्या अर्थाने ?"

"तुला माझ्या मालकिणीची ती डबी आठवते ?"

"हो."

"मी ती परत केली नाही. मला वाटलं ते प्रकरण तिथंच संपेल." तो मान खाली घालत म्हणाला.

"तू ती परत का दिली नाहीस ?"

"मला वाटलं ती श्रीमंत आहे. आणि एकदा चोरीला गेलेली वस्तू परत कशाला द्यायला हवी ? आणि मी काही ती चोरली नव्हती."

"मी चोर आहे." मी म्हणाले.

त्याने ऐकल्या न ऐकल्यासारखं केलं. "ती डबी विनाकारण मी हरीरामला दिली." तो म्हणाला.

"त्याला माझं नाव सांगितलंस?"

"नाही. त्याने ती डबी विकली आणि माझा हिस्सा मला दिला." त्याने खिशातून नोटांचे बंडल बाहेर काढले.

"ह्या तुझ्यासाठी आहेत." त्याने काही नोटा माझ्यापुढे केल्या.

"मला नको. मी घेणार नाही."

"का नको ?"

"मला त्याची आवश्यकता नाही."

"तू माझा अवमान करतेस."

त्याच्या चेहऱ्यावर संशय आणि दुःख दिसत होते. मी त्याला दुखावले होते. मी त्याच्या हातावर हात ठेवला. "जाऊ दे. मला खरंच पैसे नको आहेत. तुला पैसे मिळाले बरं झालं."

त्याचा माझ्यावर विश्वास बसेना. मी काय सांगत होतो ते त्याला कळत नव्हते. मला ओळखण्याची त्याच्यात पात्रता नव्हती.

"तू पैसे घेतलेस आणि चोरी सापडली तर तू त्यात अडकशील, म्हणून तू पैसे घेत नाहीस. पण बिलकूल घाबरू नकोस. सर्व काही टाकठीक झालंय."

"याचा अर्थ ?"

"तुला त्या मोलकरणीविषयी मी बोललो होतो. तिने माझ्याविषयी चुगली केली होती. काहीतरी घडणार असं मला सारखं वाटत होतं. पोलिस माझा पाठलाग करताहेत असं वाटलं तेव्हा, मी आणखीन एक चोरी केली–आणि त्या दोन्ही चोरींचा आळ मोलकरणीवर येईल असं केलं."

मी शांत राहिले. त्याला वाटलं मी या कृत्याशी सहमत आहे. तो पुढे सांगू लागला. "माझ्या मालकिणीच्या ड्रॉवरमधले पैसे मी चोरले आणि तिच्या खोलीतील बॅगेत ठेवले. पोलिसांनी झडती घेतली तेव्हा, त्यांना सापडले. तिने चोरीचा इन्कार केला. पण कोण ऐकतोय ?"

"ती बाई कुठे आहे आता ?"

"तुरुंगात. ती कबूल करणार नाही पण तो पोलिस तिच्याकडून कबूल करून घेतील. तिला मारतीलसुद्धा."

त्याला आपण काहीतरी मोठं कृत्य केलं असं वाटत होतं.

"तिचं नाव काय ?"

"मेरी रॉड्रिक. ती मध्यमवयाची आहे. आपल्याइतकं कामसू आणि प्रामाणिक कोणी नाही असं तिला वाटतं." तो कुत्सितपणे हसू लागला.

"तू हरामखोर आहेस." मी एक निश्वास टाकून म्हणाले.

"काय म्हणालीस ?"

मी त्याला हरामखोर म्हटलेच होते. मी आणखीन् निर्धार केला. माझ्या नाकपुड्या रागाने फुलल्या होत्या. "आणि मी पैसे घ्यावेत अशी तुझी इच्छा आहे ?"

"पण तू इतका पराचा कावळा कशाला करतेस. ते कदाचित तिला सोडूनही देतील."

"तू एका निरपराध बाईला तुरुंगात पाठवलंस. आणि हे सारं सांगायला तुला शरम कशी नाही वाटत ? हरामखोर आहेस तू."

तो बेफाम रागावला. त्याच्या चेहऱ्यात रक्त उतरले. त्याने माझा हात पकडला, "मला हरामखोर म्हणायचं बंद कर."

"का ? माझ्या मते तू हरामखोर आहेस, आणि तसं म्हणायला मी घाबरणार नाही."

तो संतापला. त्याने माझा हात पिळवटला. मी माझा हात सोडवून घेतला. "तू मला मारायचं ठरवलंस हे काही बरे नाही."



**एक नवीन ऑक्टोबर क्रांति "हरित"**

अनुक्रमणिका

"मी जाते. सर्व काही संपलं. यानंतर तू मला भेटायचा प्रयत्न करू नको."

मी चालतच घरी निघाले. काळोख पडला होता. आकाश ढगाळले होते. मधूनच पाण्याचा शिडकाव होत होता. दिव्याच्या अंधुक प्रकाशात मी एका माणसाला रस्ता ओलांडताना पाहिले. तो हरीराम होता. संतापाने मी अजूनही थरथरत होते. एका निरपराध बाईला राजेशने तुरुंगात पाठवले होते. अन्याय केला होता. त्या अन्यायाविरुद्ध मला झगडायचे होते. मी चालत असतानाच मला राजेशचा आवाज ऐकू आला. "सुप्रिया, सुप्रिया !"

मी न ऐकल्यासारखं केलं. त्याने माझे बाहू पकडले.

"सुप्रिया, अशी मला सोडून जाऊ नको. आपली मैत्री अशी संपू नये."

मी माझा हात सोडवून घेतला. दिव्याच्या प्रकाशात मला हरीराम उभा असलेला दिसला. "माझं तुझ्यावर प्रेम आहे; माझं तुझ्यावर प्रेम आहे." राजेश माझ्यामागं बावत होता.

मला त्याच्याबद्दल दया तसाच तिरस्कारही वाटला. मी शांतपण म्हणाले, "राजेश तू परत का जात नाहीस ?"

"माझं तुझ्यावर प्रेम आहे."

"आपलं प्रेम इतिहासजमा झालं आहे. तू आता जा. आपल्या दोघांच्या कल्याणासाठी."

आम्ही रस्त्याच्या काळोख्या भागात उभे होतो. त्याने माझ्या कमरेभोवती हात घातला आणि माझे चुंबन घ्यायचा प्रयत्न केला. मी त्याच्या पकडीतून सुटण्याइतपत काटक होते. स्त्रीची इच्छा नसेल तर कोणीही तिला आपल्या मर्जीप्रमाणे वागवू शकणार नाही. मी हरीरामला जोरात हाक मारली.

"हरीराम, तुझ्या दोस्ताला माझी पाठ सोडायला सांग. तो तुझा दोस्त आहे. तुझं तो ऐकेल.

"ही तरुण स्त्री काय सांगते ऐकलंस ?"

"पण मी. मी. .

मला वाटले ते दोघं थोडी वाचावाची करतील आणि राजश घाबरून पळेल, पण भलतंच काही झालं. हरीरामने राजेशला एक लगावली. त्याबरोबर राजेश गटारात पडला. हरीराम माझ्या पुढ्यात उभा राहिला. राजेश थोड्या वेळात भानावर आला. त्यान आमच्याकडे न पहाताच धूम ठोकली.

"चल." हरीराम म्हणाला आणि स्वप्नात असल्याप्रमाणे, मी त्याच्या मागोमाग, माझ्या घराच्या दिशने चालू लागले.

तो माझा दंड धरून चालला होता. त्याचा हात लोखंडी पंजाप्रमाणे वाटत होता.

"तू राजेशला मारायला नको होतं. तो आपोआपच निघू गेला असता."

"आता तो तुला केव्हाच त्रास देणार नाही."

त्याचे ते लोखंडी बाहू आणि कमावलेली शरीरयष्टी पाहून मला तशी भीती वाटत होती. तसंच कुतुहल पण वाटत होतं.

आम्ही घरी आलो. मी माझा हात त्याच्या हातात दिला

"मला सोबत दिल्याबद्दल आभार."

"मी वर येतो" असे म्हणून तो जवळ आला. मला त्याला नाही म्हणायचे होते; पण तो अशा रीतीने माझ्या डोळ्यात पहात होता की, मी म्हणाले, "तुला जसं वाटेल तसं."

"घाबरू नकोस माझ्याकडे पैसे आहेत. दुसरे देतात त्याहून दुप्पट देईन."

"त्याविषयी नाही रे. मला दमल्यासारखं वाटतंय म्हणून."

"त्याच्या चेहऱ्यावर रागाची छटा दिसली. माणसाच्या हालचालीवरून, त्याची प्रवृत्ती समजते. माझ्या चेहऱ्यावर भीतीची छाया उमटली.

"काय झालं ?" दात चावत त्याने विचारलं.

"काही नाही. तुझे हात खूप थंड आहेत."

"मी तुला आवडत नाही ?"

त्याच्या नजरेला नजर भिडवणे अशक्य होतं.

"तुला माहीत आहे, मी काय म्हणतो ते ? तू अन् तुझ्यासारख्या बायकांना नखरेबाज तरुण आवडतात. मी सीधासाधा आहे."

राजेशशी त्याचं भांडण झालं म्हणून त्याने, त्याला मारलं, असं मला वाटलं होतं; पण त्याचा स्वभावच तसा होता. त्याला कुणीकडून भांडण उकरायचे अशी सवय होती असे दिसले.

"माझा अपमान कशाला करतोस ? मी तुला अगोदरच सांगितलंय, मला सारे पुरुष सारखे म्हणून !"

"तूं खरं बोलशील तर तुझा चेहरा असा होणार नाही."

"कशाला डोक्यात राख घालतोस ?"

"राजेशला आपल्या मार्गातून घालवून देण्यासाठी तू माझा उपयोग केलास आणि आता काम झाल्यावर मलाही उडवून लावत होतीस; पण मीच वर आलो." आता मला त्याची खरंच भीती वाटली.

"तू तिरस्करणीय आहेस."

त्याला बरे वाटले. तो बसला. "आपण सारेच तिरस्करणीय आहोत." तो माझ्याकडे न पाहाता म्हणाला."

"तुझ्या कपाळाला आठ्या कां ?








त्याने मला विचारले.

"मी आवडते ना तुला !"

"अजूनही तुला भीती वाटते ?"

"होय."

"म्हणजे याचा अर्थ मी इथून निघून जावं असा आहे."

मी त्याच्याकडे पाहिले. जर मी त्याला होय म्हटलं असतं तर, मला त्याचा मार खावा लागण्याची भीती होती.

"नाही. तू रहा; पण तो दिवा घालव प्रथम."

मी थकून गेले होते. मला झोप लागली. काही वेळाने तो मला मारीत आहे, माझा गळा दाबीत आहे असे वाटले. मी त्याला जोराने ढकलले आणि डोळे उघडले. हरीराम तर खुर्चीवर बसला होता. एकूण मला भास झाला होता. तो म्हणाला,

"तू अजूनही मला घाबरतेस ?"

"मला सांगता येत नाही."

"मी कोण आहे हे जर तुला समजले तर तू खूप घाबरशील."

"तू कोण आहेस ?"

"मी कोलडोंगरीचा खूनी माणूस आहे. माझ्या शोधात सारे पोलीस खाते आहे."

कोलडोंगरीला झालेल्या खुनाची सारी माहिती सांगायची आवश्यकता नव्हती. तिथे एका व्यापाऱ्याचा खून झाला होता. आई सारा दिवस वर्तमानपत्रातील खुनाच्या बातम्या सांगत असते. आणि तिनेच मला ती बातमी सांगितली होती. एक वजनदार पेपरवेट मारून त्याचा खून झाला होता. तो व्यापारी चोरीचा माल घेत असे.



थोडा वेळ मला काहीच समजेना. माझी विचार करण्याची शक्तीच संपली होती.

"पण तू असं कां केलंस ?"

"मी त्याच्याकडे एक किंमती वस्तू विकायला दिली होती. तो मला हवे असलेले पैसे देईना म्हणून मी ती परत मागितली. यावर तो काहीतरी म्हणाला, अन् मी भडकलो आणि त्याने मला मारले."

"झाल्या गोष्टीबद्दल तुला वाईट नाही वाटत ?"

"झालं गेलं होऊन गेलं. त्यात कसलं वाईट वाटायचं ?"

"तू हे मला सारं का सांगितलंस ?"

"तू इतकी घाबरतेस मला ?" तो शांतपणे म्हणाला.

"सहज म्हणून सांगितलं तुला."

"तू जा आता. मला एकटी राहू दे."

"आता काय झालं आणखीन् तुला ?"

"मी घाबरले, म्हणून समजू नको." मी घाईघाईने म्हणाले.

"मला वाटलं तू घाबरून मला घालवून देतेस."

"नाही नाही. तुला राहायचं असलं तर जरूर रहा आणि समज पुन्हा केव्हा तुला इथं यायची इच्छा झाली तर तू येऊ शकतोस."

तो काहीच बोलला नाही. त्याने आपल्या पॅण्टच्या खिशातून पैसे बाहेर काढले.

"नको. नको. मला काही देऊ नको."

"का दुसऱ्याच्या पैशाइतके माझे पैसे चांगले नाहीत वाटतं ?" त्याने रागावून विचारले.

"तसं काही नाही. मी तुला जेव्हा बोलावले तेव्हा पैशाचा विचारच केला नव्हता."

तो शांत झाला. "तुला काही भेट द्यायची मला इच्छा आहे." त्याने आपल्या खिशातून काहीतरी बाहेर काढले आणि टेबलावर ठेवले.

मी त्या वस्तूकडे निरखून पाहिले. राजेशच्या मालकिणीच्या घरची मी चोरलेली सोन्याची डबी होती.

"अस्सल सोनं आहे." तो म्हणाला. "राजेशने विकायला दिलं होतं त्या व्यापाऱ्याला. फुकट घशात घालायची इच्छा झाली. आणि म्हणून नाहक मेला."

"आभारी आहे." माझ्या मनाचा तोल न जाता मी म्हणाले.

"आभार कसले ?" असं म्हणून त्याने दरवाजा उघडला.

"बाय बाय. पुन्हा भेटू." थोड्याच वेळात दरवाजा बंद झाल्याचा आवाज ऐकू आला.

मी डबी पाहिली. माझी परिस्थिती द्विधा झाली होती. एक प्रकारच्या योगायोगानेच ती डबी माझ्याकडे परत आली होती; पण या साऱ्या गोष्टीची जबाबदारी माझ्यावर पडते का ? मी विचार करू लागले. राजेश माझ्याशी लग्न करणार म्हणून मी माझे सर्वस्व त्याला अर्पण केले. त्याने लग्नाला नकार देताच रागाने सोन्याची डबी चोरली. राजेशची नोकरी जाईल म्हणून मी ती परत केली. राजेशने निरपराध मोलकरणीला तुरुंगात पाठवले; आणि ती डबी हरीरामकडे विकायला दिली. हरीरामने रागाच्या भरात व्यापाऱ्याला ठार मारले; आणि ती डबी माझ्या शरीरसुखाच्या मोबदल्यात भेट दिली. मी दोन-तीन तास झोपले. झोपेत मी तुरुंगाच्या कोठडीत आहे असं मला स्वप्न पडलं. मी जागी झाले आणि मला राम म्हात्रेची आठवण झाली. तो त्या मोलकरणीला नक्कीच सोडवू शकला असता. मी पुन्हा झोपी गेले.

* * *






अनुक्रमणिका

# [ १२ ]

नंतरच्या दिवशी सकाळी मी व्यवस्थित पोषाख केला आणि ती सोन्याची डबी पर्समध्ये टाकून राम म्हात्रेला फोन करण्यासाठी बाहेर पडले. जाता जाता मी काही वर्तमानपत्रे खरेदी केली. कोलडोंगरी खुनाची काही बातमी आहे का मला पहायचं होतं. "व्यापाऱ्याच्या खुनाचे धागेदोरे मिळत नाहीत" अशी बातमी होती. पोलिसांनी जवळजवळ आशा सोडून दिल्यासारखेच होते.

एका छोटयाशा रेस्टॉरंटमध्ये मला सार्वजनिक टेलिफोन दिसला. मी राम म्हात्रेला फोन केला. गेले सहा आठवडे त्याला टेलिफोन केला नव्हता. त्यामुळे त्याने माझा आवजच ओळखला नाही. तो इतरांशी पोलिसी खाक्यात बोलतो तसाच माझ्याशी बोलू लागला. क्षणभर वाटले तो माझ्याशी ओळख दाखवू इच्छित नाही आणि मला त्याची आवश्यकता होती त्यावेळी हे घडत होतं. मला त्या मोलकरणीला सोडवायचे होते. मी घावरूनच राम म्हात्रेला माझे नाव सांगितले. तावडतोब त्याचा आवाज बदलला. त्याने तावडतोब मला भेटायला यायचे कबूल केले.

राम मला दुपारी भेटणार होता. तोपर्यंत मला खूप वेळ होता. म्हणून मुमताजला भेटायचे मी ठरवले. बरेच दिवसात तिला मी भेटले नव्हते. या काळात तिला दुसरा कुणीही भेटण्याची शक्यता होती. तिलाही एक दिवस स्वतंत्र संसार थाटायचा होता. जगातल्या प्रत्येक स्त्रीच्या मनात हीच इच्छा असते.

मी मुमताजच्या घरी गेले तेव्हा ती तिथे राहात नसल्याचे समजले. अल्टामाऊंट रोडला ती आता राहात होती. एके दिवशी एक तरुण माणूस येऊन म्हणे तिला गाडीतून घेऊन गेला. मी तिच्याविषयी हीच कल्पना केली होती. पण हे ऐकून मला मात्र वाईट वाटले. मी लगेच मुमताजला भेटायला निघाले.

मुमताजचा फ्लॅट एका नव्या इमारतीत होता. मी आत शिरले तेव्हा ती केस विंचरीत होती.

माझ्याकडे पाहून मुमताज म्हणाली, "सुप्रिया ! आज माझी आठवण झाली होय ! बस, उभी का ? मी आत्ताच आले."

"तुला माझी जागा कशी काय आवडली ?" ती आपल्या नखांचा रंग पहात म्हणाली. नंतर तीच पुढे म्हणाली,

"तुला आठवतो तो गोरटेला माणूस ? रमेश त्याचे नाव. त्याच्याशी मी त्या रात्री भांडले होते. तो मला पुन्हा भेटला. मला वाटला होता तितका वाईट नाही तो. आम्ही अनेक वेळा भेटलो. काही दिवसांपूर्वी त्याने मला गाडीतून इथं आणली आणि या फ्लॅटमध्ये ठेवलं." एक प्रकारच्या समाधानाने हसली ती.

मी तिच्याजवळ गेले. आनंदीत झाले. आनंद दाखवून तिचे चुंबन घेतले.

"मुमताज तू इथं रहायला आलीस हे मला कळवायला हवं होतं."

"मला वेळच मिळाला नाही." ती घाईघाईने म्हणाली.

मुमताजकडे थोडा वेळ पाहून परत निघताना थोडंसं धैर्य करून तिला विचारलं "तुझ्या मित्राने आपल्या दोस्तावद्दल कधी काही सांगितलं का ?"

"त्या विद्यार्थ्याबद्दल ? का ? तुला आवडतो ?"

"नाही मी सहज म्हणून विचारले."

"आम्ही काल संध्याकाळीच त्याला भेटलो होतो" माझी उत्सुकता मी दाबू शकले नाही. "मग तू त्याला पुन्हा केव्हा भेटलीस तर मला भेटायला सांग. सहज म्हणून."

"बरं मी सांगेन त्याला." ती संशयी नजरेने माझ्याकडे पहात म्हणाली.

मी राम म्हात्रेला माझ्या घरीच बोलावले होते. मी घरी गेले तेव्हा माझा चेहरा उन्हाने करपून गेला होता. अशी दुपारचे बाहेर पडायची मला सवय नव्हती. आईने दरवाजा उघडला आणि कुणी तरी माझ्या खोलीत वाट पहात असल्याचे सांगितले. मी रामकडे न पाहताच बिछान्यावर जाऊन पडले.

तो काहीच बोलला नाही. त्याने माझा हात उचलला आणि तो आपल्या ओठांना लावला.

त्याचे ओठ थरारले "माझं प्रेम आहे तुझ्यावर."

"प्रेम करण्यासाठी आणि दुसऱ्या काही गोष्टी करण्यासाठी काही ठराविक वेळ असते. ते नको म्हणून तर तुला मी एक वाजता बोलावलं. खरंच तुझ्यासारखा तूच ! शरम नाही का वाटत तुला, या तुझ्या वागण्याची ?"

त्याने माझ्याकडे शांतपणे पाहिले. मी त्याचे मन तावडतोब ओळखले. खरंच तो माझ्या प्रेमात पडला होता आणि कित्येक दिवस तो ह्या क्षणाची वाटच पहात होता. माझं चित्त ठिकाणावर नव्हतं आणि तो मात्र माझाच विचार करत होता. मी थोडया रागावलेल्या स्वरात म्हणाले, "आता जर मला.

त्याने मान हलवली. मी हसून म्हणाले, "मला काही गोष्टी आवडत नाहीत. मी दुःखी असते. याविषयी काही तुझ्या मनात विचार येतात तरी का? पण त्याने तिकडे लक्षच दिले नाही. थोडया वेळाने मी त्याला म्हणाले, "मी तुला एका महत्त्वाच्या कामाविषयी विचारणार आहे."

त्याने माझ्याकडे पाहिले. त्याने माझा हात हातात घेतला आणि तो थोपटू लागला. यावेळी त्याच्या मनात माझ्याविषयीच्या वासनेशिवाय काही नव्हते.

"तू पोलिस अधिकारी आहेस ना !"

"होय."

"मग मला पकड. मला तुरुंगात टाक." मी निक्षून म्हणाले. त्यावेळी मला तसे खरेच वाटले होते.

"का ? काय झालं ?"

"मी चोर आहे" मी मोठ्याने म्हणाले. "मी चोरी केली आहे आणि माझ्याऐवजी एक निरपराध मोलकरीण तुरुंगात खितपत

अनुक्रमणिका






पडली आहे. मला पकड. माझी शिक्षा भोगायची तयारी आहे."

"काय झालं असेल ते सारं सांगून टाक." तो निर्विकार चेहऱ्याने म्हणाला.

थोडयाच शब्दात मी त्याला सारी हकीगत सांगितली.

मी राजेशच्या कृत्याची आणि हरीरामची सर्व माहिती त्याला सांगितली. प्रथम मला हरीरामविषयी सांगायचं नव्हतं; पण मला त्या निरपराध बाईला सोडवायचं होतं. शेवटी मी म्हणाले, "आता त्या बाईला तुरुंगातून बाहेर काढ. नाहीतर मला पाठवं."

"इतकी हातघाईला येऊ नकोस. सध्या ती गुन्हेगार आहे आणि तिला अजून काही शिक्षा झालेली नाही. थोडा धीर धर."

"नाही, मला आता धीर धरवत नाही. ती तुरुंगात आहे. ते तिला मारतील. तू काय तो पक्का बंदोबस्त केला पाहिजेस."

माझ्या आवाजावरून मी मनापासून बोलतेय हे त्याला समजले. तो उठला आणि खोलीत फेऱ्या मारू लागला. आणि स्वतःशीच म्हणू लागला. "पण ती ते नाकारतेय. कुणी तरी द्वेष बुद्धीनेच ते तिच्या बॅगेत ठेवले असे आपण सांगू शकतो."

"तुझ्याजवळ ती सोन्याची डबी आहे?"

"हो! ही घे!" असं म्हणून मी माझ्या बॅगेतून ती सोन्याची डबी काढली आणि त्याच्या हातात देऊ लागले, पण त्याने तिला हात लावला नाही.

"मला देऊ नकोस. मी त्या मोलकरणीला सोडेन; पण पोलिसांना तिच्या निरपराधित्वाचा पुरावा मिळाला पाहिजे.

"मग मी काय करू या डबीचं?"

"त्याचाच विचार करतोय." तो फेऱ्या घालू लागला.

"मग तू असं कर" तो थांबून म्हणाला, "नजिकच्या पोलिस स्टेशनवर जाऊन ती डबी दे. तुझ्याकडे आलेल्या एका गिऱ्हाईकाने रात्री काळोखात बक्षिस दिल्याचे सांग. तुझं नाव न गोवण्याची व्यवस्था मी तेथील इन्स्पेक्टरला सांगून करतो. हे झालं की एक दोन दिवसात त्या मोलकरणीची सुटका करतो."

मी हर्षभराने माझे हात त्याच्या मानेभोवती टाकले आणि त्याची चुंबने घेऊ लागले. तो शांत आवाजात पुन्हा म्हणाला, "अशा भानगडीत तू पुन्हा पडू नकोस. तुला ज्रेव्हा पैशाची आवश्यकता भासेल तेव्हा मला टेलीफोन कर."

मी थोडा वेळ स्तब्ध राहिले. माझ्या एका हातात ती डबी होती. सुटका झाल्यामुळे त्या मोलकरणीला किती आनंद झाला असेल ते मी अनुभवू लागले. माझ्या हृदयावरचा भार हलका झाला होता. राम माझ्या हाताची बोटं कुरवाळत होता. मी त्याच्याकडे लाडीकपणे पाहून म्हटले,

"खरंच तुला हवं आहे का ते?"

त्याने न बोलताच मान हलवली.

"तू दमला नाहीस का?" मी त्याला विचारले. उशीर होतो असं नाही का वाटत तुला? आणि उद्यापर्यंत थांबलास तर!"

त्याने मान हालवली.

"खरंच तू माझ्यावर इतकं प्रेम करतोस!" मी त्याला विचारले.

"खरंच सुप्रिया मी तुझ्यावर खूप प्रेम करतो. तुझ्याशिवाय मला काही सुचत नाही." तो धुंद आवाजात म्हणाला.

थोडया वेळाने तो शांत झाला. मी दरवाजा बंद केला. मी खिडकीकडे गेले. ती उघडली आणि पुन्हा बंद केली. माझ्या या हालचालीकडे त्याचे पूर्ण लक्ष होते. मी खिडकी बंद केल्यावर कपाट उघडले. कपडे घडी करून आत ठेवले. नंतर तशीच गुणगुणत आरशात पाहिले. मी इतकी सुंदर असल्याचे मला केव्हाच वाटले नव्हते. माझ्या डोळयात चमक होती. माझ्या नाकपुडया कापत होत्या. माझे ओठ अर्धवट उघडे होते. त्यातून माझे पांढरे स्वच्छ दात दिसत होते. मी खूप सुखात असल्यामुळेच इतकी सुंदर दिसत होते. मी गाणे गुणगुणत असतानाच दारावर थाप पडली.

"मी आता येऊ शकत नाही. थोडया वेळाने."

"खूप महत्त्वाचं काम आहे" आईचा आवाज ऐकू आला.

मी दरवाजाकडे गेले आणि बाहेर डोकावले.

"बाहेर एक माणूस तुझ्याशी बोलायला मागतोय." आई म्हणाली.

"कोण आहे तो?"

मला माहीत नाही; पण बुटकासा गच्च गळयाचा तरुण आहे.

मी आतला दरवाजा उघडला आणि डोकावून पाहिले. रविकांतला पाहून मी दरवाजा बंद केला.

"त्याला सांग मी आत्ता येते." मी आईला म्हणाले.

राम बिछान्यावर बसला होता

मी त्याला म्हणाले "मला वाईट वाटतं, तुला आता गेलंच पाहिजे."

त्याचा चेहरा व्यग्र झाला. त्याला काही तरी बोलायचे होते. तेवढयात मी म्हणाले, "माझी आत्या खूप आजारी आहे. तिला पाहण्यासाठी माझ्या आईबरोबर आताच गेलं पाहिजे." हे खोटंच सांगितलं. पण त्यावेळी दुसरं कोणतंच कारण सापडलं नाही. त्यानं माझ्याकडे अशा चेहऱ्याने पाहिले, की जसं काही त्याला आपल्या वाईट नशिबाला दोष द्यायचा होता.

"बरं मी जातो." तो खाली वाकला आणि बूट चढवू लागला. मी त्याच्या पुढयात कोट घेऊन उभी राहिले. त्याने मोलकरणीला सोडवण्यासाठी मला काही तरी वचन द्यायला हवे होते. मी त्याला कोट देत म्हणाले, "झाल्या गोष्टीबद्दल मला फार वाईट वाटते. उद्या संध्याकाळी तू ये. म्हणजे आपल्याला मधेच असा त्रास होणार नाही."

तो काहीच बोलला नाही. जणू काही तो प्रथमच घरी येतोय अशा रीतीने मी त्याचा हात घट्ट धरून त्याला दरवाजापर्यंत पोचवले. कदाचित तो आत डोकावून पाहील म्हणून मला भीती होती.

"मी आज पोलिस स्टेशनवर जाणार आहे." दरवाजा उघडत मी म्हणाले, आपल्याला समजल्याचे त्याने मला हलवून दर्शविले. त्याचा चेहरा त्रासलेला आणि सुकलेला वाटत होता. मी अधीर झाले होते. तो जाईपर्यंत मी थांबले नाही. मी दरवाजा बंद केला.

* *

अनुक्रमणिका

[ १३ ]

रविकांतला मी आत घेतले.

"मी सहज या बाजूने जात होतो तेव्हा म्हटलं तुला भेटू."

"बरं केलंस. मी आत्ताच बाहेर जाणार आहे. आपण बाहेरच जेवू. पण तू इतके दिवस का आला नाहीस ?" मी त्याच्या हाताचे चुंबन घेतले आणि तो हृदयाशी घट्ट पकडला.

त्याचा चेहरा गढूळ झाला. "जरा थांब, मी माझी ब्रीफ केस घेऊन येतो."

तो कदाचित् पळून जाईल अशी मला भीती वाटू लागली. मी दरवाजात चावी अडकवली आणि तो बंद करून घेतला. मी आरशा-समोर उभी राहून, माझ्या तोंडावरचा सारा रंग रुमालाने पुसून काढला. लिपस्टिक घेऊन ओठावरून फिरवलो. माझ्या केसांची रचना दिखाऊ होती. मी केस पुन्हा सोडले आणि विंचरले आणि राजेशशी लग्न ठरल्यावर जशी मी केसांची रचना करत असे तशी केली आणि रविकान्तला बोलावले.

"मी पळून जाईन म्हणून तू घाबरलीस होय!" त्याने माझ्या हातातली चावी घेतली आणि दरवाजा उघडला.

"तू रागावलास माझ्यावर ?" मी त्याचा हात हातात घेऊन म्हणाले.

आम्ही हातात हात घालून खूप भटकलो. त्याच्याबरोबर असे भटकण्यात मला खूप आनंद वाटला.

"तू मला भेटल्यामुळे मला किती आनंद झाला म्हणून सांगू !" मी म्हणाले.

"मलासुद्धा बरं वाटलं !" तो म्हणाला पण त्याच्या चेहेऱ्यावर मात्र आनंदाचे भाव नव्हते.

"ऐक मला काही तरी सांगायचं आहे."

"मग सांग ना."

"मी सहजच म्हणून तुला पहायला आलो. माझ्याकडे काहीसुद्धा पैसे नाहीत. मी गेलेलं बरं."

त्याने असं म्हणताच मला वाटलं, तो आता मला सोडून जातो. त्याने तसं करू नये म्हणून मी त्याला घट्ट पकडले आणि रडू लागले. पण दुसऱ्याच क्षणी मला वाटले हे कारण काही ठीक नाही. त्याच्या-साठी मी सहज पैसे खर्च करू शकले असते. दोघांचे पैसे देण्याची कल्पना मला फार आवडली. त्यात एक प्रकारचं थ्रिल होतं. "माझ्या-कडे खूप पैसे आहेत. तू कसलाच विचार करू नकोस." मी माझी पर्स उघडून त्यातल्या नोटा मी त्याला दाखवल्या.

"हे काही बरं नव्हे." अपेक्षाभंग झाल्याप्रमाणे तो म्हणाला.

"त्यात काय झालं ? तू परत आल्याचा मला किती आनंद झाला म्हणून सांगू. मला हा आनंद साजरा करायचा आहे."

"नाही नाही." माझा हात सोडून जाण्याचा तो प्रयत्न करू लागला.

"याविषयी आपण जास्त न बोललेलं बरं" असं म्हणून, त्याला घेऊन मी फोर्टमधील खाजगी बारमध्ये गेले. मी माझ्या इतर प्रियकरांबरोबर तिथे जात होते त्यामुळे मला तिथले नोकर चांगलेच ओळखत. मी मद्याची ऑर्डर दिली आणि वेटर निघून जाताच, माझी पर्स उघडून त्यातली शंभराची नोट त्याच्या हातात सरकवली.

"पैसे. तू बिल देऊ शकशील."

त्याने ती नोट घडी केली, आणि माझी पर्स उघडून आत टाकली. हे सारे त्याने गंभीरपणे केले.

"मीच पैसे द्यावे अशी तुझी इच्छा आहे का ?"

"नाही, मी देईन की !" तो म्हणाला.

"मग तू आपल्याकडे पैसे नाहीत असे का म्हणालास

तो क्षणभर थांबला. मी सहज म्हणून काही तुला पहायला आलो नाही. गेला महिनाभर तुझ्या घरावरनं मी चकरा घालतोय पण वर येण्याचा धीरच होईना. वाटलं, तुला पैसे नाहीत म्हटलं की तू मला परत पाठवून देशील."

"तुला का निघून जायचं होतं ?"

"कारण मला तुझ्याविषयी काही वाटत नाही म्हणून !"

'मग असं असूनही तू का आलास ?"

"त्याचं कारण मी मग तुला सांगेन."

"काही हरकत नाही. तू आलास हेच मला पुरेसं आहे."

मी माझे हात टेबलाखालनं त्याच्या गुढघ्यावर ठेवले. मी त्याच्या चेहऱ्याचं निरीक्षण करीत होते. माझ्या स्पर्शामुळे तो त्रासला होता. तो घाबरत होता. माझ्याबद्दल त्याला आपुलकी वाटावी असं काही तरी करायला हवं होतं. कारण मला त्याच्याबद्दल आपुलकी वाटत होती. राजेशनंतर मी रविकान्तवर प्रेम करत होते. जमलं तर त्याच्याशी लग्न करण्याची माझी इच्छा होती. थोड्या वेळाने वेटर ऑर्डर घेऊन आला.

आम्ही दोघेही पिऊ लागलो.

"चल आपण जाऊ" तो म्हणाला.

"कुठे ?"







"तुझ्या घरी."

"प्यायचं तर संपू दे."

"जशी तुझी मर्जी. पण मग मी जास्त प्यालेला असेन."

"माझी काही हरकत नाही."

"पण मी इतका पितो की, त्यामुळे तुला त्रासच व्हायचा."

"मग तर तू पिऊ नकोस." मद्याची बाटली बाजूला सारण्यासाठी मी हात पुढे केला.

"इतकं काही घाबरायला नको. पण तू लवकर का संपवत नाहीस ?"

"मी जास्त पीत नाही. मला टाईट व्हायला एक पूर्ण पेग पुरे."

"मग आपण दोघही टाईट होऊ."

"बायका जेव्हा जास्त पितात तेव्हा त्या घाणेरड्या वाटतात."

"घाणेरड्या वाटायला काय झालं ?"

"प्याल्यानंतर लटपटणाऱ्या, घाणेरडे बोलणाऱ्या, वाईट खुणा करणाऱ्या बायका पाहिल्या की मला कसंसंच होतं. मी एक दुःखी स्त्री आहे. आणि जर का मला तू पाहिलीस तर पुन्हा माझं तोंड पहायची तुला इच्छा होणार नाही."

"समज मी तुला आज्ञा केली तर ?"

"तुला माझा मानभंग झालेला पहायचा आहे का ?" मी दुःखी चेहऱ्याने म्हणाले. "मी दिसायला घाणेरडी नाही, हाच माझ्यात एक चांगला गुण आहे. मी प्याले की ओंगळ वाटेन. तेच जर तुला हवं असेल तर बघ !"

"हो मला तेच पाहिजे." तो शब्दावर जोर देऊन म्हणाला.

"मग भर माझा ग्लास." मी म्हणाले. त्याला खूष ठेवण्यासाठी वाटेल ते करायला मी तयार होते.

त्याने ग्लासात मद्य ओतण्याऐवजी तो माझ्याकडे पाहू लागला. "मी गम्मत केली तुझी."

आम्ही दोघं माझ्या घरी जायला निघालो. आमचा कोणी तरी पाठलाग करत आहे, असं मला राहून राहून वाटू लागलं. मी बारीक नजरेने लक्ष देऊन पाहिले. मला हरीरामची छाया दिसली. की कोण जाणे त्यावेळी माझं अंग शहारलं. मी झपझप पावले टाकत रविकान्तला ओढतच घरी आणलं. त्याला जीना चढवत नव्हता. इतका तो प्याला होता

मी त्याला ओढतच खोलीत शिरले आणि त्याला बिछान्यावर ढकलले. त्याच्या चेहऱ्यावरून तो ओकेल की काय असे मला वाटले



आणि मी घाबरून गेले. कारण दुसऱ्या वेळचीही भेट अशीच वाया जाऊ नये असं मला वाटत होतं. मी त्याला जास्त पिण्यापासून परावृत्त केले नाही म्हणून, मी मलाच दोष दिला. मी निराश झाले. तरीपण त्याच्याबरोबर शय्यासुख घेण्याची इतक्या दिवसाची मनात ठेवलेली इच्छा अशीच अपूर्ण ठेवावी असे मला वाटले नाही. मी खरोखरीच त्याच्या प्रेमात पडले होते. आणि तो माझ्या हातून तसाच निघून जावा हे मला पटेना. मी त्याच्या शेजारी बसले नि मी सारखी बोलत होते. त्याचे मन बदलू नये आणि मला सोडून त्याने जाऊ नये म्हणून मी परिश्रम घेत होते.

"तू तुझं वय सांगितलं नाहीस मला." मी त्याची टाय सोडत विचारले.

"मी एकोणीस वर्षाचा आहे." तो क्षणभराने म्हणाला.

"माझ्याहून दोन वर्षाने लहान आहेस तर !"

"तू एकवीस वर्षाची आहेस ?"

"हो. खरं म्हटलं तर बावीसावं संपेल आता."

मला त्याच्या टायची गाठ सोडायला जमेना. त्याने मला दूर केले आणि टाय सोडली.

"ही टाय जुनी झाली आता. मी तुला दुसरी घेऊन देईन." मी म्हणाले. "तुझा आवडता रंग कोणता ?"

तो हसू लागला. त्याच्या त्या हसण्यावर खरोखरीच मी फिदा झाले.

"खरोखरीच तू मला 'ठेवणार' आहेस का ? कारण जेवणाचे पैसे तूच देणार होतीस. आता टाय देण्याची गोष्ट चालू आहे."

"काहीतरीच काय बोलतोस ? मी तुला टाय घेऊन दिली तर एवढं काय बिघडलं ?" हे कारण काही भांडणाला पुरेसं नाही.

"मी एकोणीस वर्षाचा आहे हे तुला खरे वाटते का ?" त्याने विचारले. त्याला आपल्याविषयी बोलायला आवडते, हे मला एव्हाना कळून चुकले. मी म्हणाले,

"तुझ्या चेहऱ्यावरून काही वाटत नाही."

तो थोडा वेळ डोळे बंद करून पडून राहिला.

"तुझ्याबद्दल मला सांगशील ? तू काय करतोस वगैरे ?" मी म्हणाले.

"मी कायद्याचा अभ्यास करतो. माझे आई वडील जमशेदपूरला असतात. मी इथं परेलला एका ठिकाणी पेईंग गेस्ट म्हणून राहतो." त्याने एका वडाक्यात सांगून टाकलं.

मी त्याच्या छातीवरून, मानेवरून, चेहऱ्यावरून हातांची बोटे फिरवत होते.

" तुला काय वाटलं मी प्यालो आहे. आणि मला.

तो एकदम भडकला नि म्हणाला, "मी प्यायलो आहे आणि मला माहीत आहे मी इथे कशासाठी आलो आहे. मला दुसऱ्याच्या मदतीची गरज नाही. आभारी आहे मी तुझा."

यावेळी त्याचा चेहरा भयंकर वाटत होता. तो एकदम उभा राहिला "मला माहीत आहे, आता काय करावं अशी तुझी इच्छा आहे." त्याच्या डोळ्यात आता नशा उतरली होती.

काही वेळाने मी दूर झाले आणि त्याच्याकडे पाहिले. तो झोपला होता. मला त्याच्याशी खूपखूप बोलायचे होते. त्याच्या हृदयात खूप खोल शिरायचे होते. पण पुन्हा एकदा मी संधी घालवली होती. कारण तो झोपी गेला होता.

मी त्याच्याकडे पहात असतानाच त्याने डोळे उघडले.

"तू पण झोपली होतीस का ?

"नाही. मी तुझ्याकड पहात होते."

तो काही वेळ शांत राहिला आणि म्हणाला, "तू मला मदत करशील ? मी तुझ्यावर विश्वास ठेवू काय ?"

"काय हा प्रश्न झाला ?" मी विचारले.

"नाही कामही तसंच फार महत्त्वाचं आहे. मी एक पार्सल तुझ्याकडे देतो. ते तू व्यवस्थित ठेव."

दुसरा कोणी असता तर ते पार्सल कसले आहे, त्यात काय आहे, वगैरे नाना प्रश्न मी विचारले असते. पण रविकातन्ला मी काहीच विचारलं नाही. कारण त्यात माझा स्वार्थ होता. त्या पार्सलाच्या निमित्तानं तरी मी त्याला पुन्हा भेटू शकणार होते.

"तुला त्या पार्सलविषयी काही उत्सुकता नाही ?"

"तसंच काही तरी गुपित असेल. नाही तर तू मला सांगितलं असतंस."

"सुप्रिया, ऐक ! तसंच फार महत्त्वाचं आहे. मी मुंबईतील नक्षलवादी ग्रूपचा मेंबर आहे. आणि त्या पार्सलात, आमच्या ग्रूपची गुप्त पत्रके आहेत. आम्हाला सध्याचे सरकार उलथायचे आहे. आणि त्यासाठी देशात अंदाधुंदी माजवायची आहे. आणि त्याचीच माहिती या पत्रकात आहे."

माझा राजकारणाशी काही संबंध नव्हता. चालू सरकारशीही माझा काही संबंध नव्हता. "पण हे वाईट आहे. घातक आहे."

"म्हणूनच ते पार्सल ठेवायचे का नाही ते तू ठरव."

"मी माझ्यासाठी म्हणत नव्हते. तुझ्यासाठी ! तुझ्यासाठी मी काहीही करायला तयार आहे." माझ्या डोळ्यात पाणी तरळले.

"पण तू रडतेस कशासाठी ?"

"माफ कर." मी म्हणाले. "खरंच मी मूर्ख आहे. मी का रडते हे मलाच माहीत नाही. माझं तुझ्यावर किती प्रेम आहे याची तुला कल्पना नाही."

तो काहीच बोलला नाही. "एक दोन दिवसांत मी येईन" तो असं म्हणून निघून गेला.

## [ १४ ]

सारं कसं अगदी सुरळीत चाललं होतं. रविकांत नेहमी येत होता. राम म्हात्रेने त्या मोलकरणीलाही सोडून दिले होते. मी खुशीत होते. रविकांताशी संबंध दृढावल्याने, आता इतर पुरुषांशी, रामशीसुद्धां संबंध ठेवायचा नाही असे मी ठरवले होते.

एके दिवशी मी आणि रविकांत सिनेमा पाहायला गेलो होतो. येताना बसमधील गर्दीत कोणीतरी माझ्या हाताला खेचत आहे असे मला वाटलं. मी वळून पाहिलं. हरीराम बसला होता. त्याने मला आपली जागा देऊ केली.

"थँक्स्. मी आता उतरणार आहे."

"बस ना!" तो पुन्हा म्हणाला.

"थँक्स् मी घाबरूनच बसले.

"मला तुझ्याशी काही बोलायचंय." हरीराम म्हणाला.

मी पोलीसाना सोन्याची दुवी दिल्याचे जर हरीरामला कळले असले तर? माझ्या मनात विचार आला पण तसं काहीच मी चेहऱ्यावर दाखवले नाही.

"बोल ना !"

"इथे नाही, घरी."

"पण मला आज वेळ नाही."

"मग उद्या सायंकाळी."

"ठीक आहे."

हरीराम पुढल्याच बसस्टॉपवर उतरून निघून गेला. आमचं बोलणं चाललं असताना रविकांत बाजूलाच उभा होता. तो सारं ऐकत होता. पण रविकांतला माझे अनेक मित्र असल्याचे माहित होतं. तो काहीच बोलला नाही.

रविकांतला सोडून मी घरी जायला निघाले. माझ्या मागोमाग कोणीतरी चालत असल्याचे मला दिसले. हरीराम होता तो. त्याने माझा बाहू घट्ट पकडला.

"तू मला उद्या भेटणार होतीस ना

"म्हटलं आजच भेटून सोक्षमोक्ष लावावा."

"कसला सोक्षमोक्ष ?"

"मला वाटू लागलंय, पोलिस माझा पाठलाग करीत आहेत. राजेश किंवा तुझ्याशिवाय, मी त्या व्यापाऱ्याचा खून केलाय हे कुणालाही माहीत नाही."

"मी तरी पोलिसांना सांगितलेले नाही. राजेशमुद्धा सांगणार नाही अशी माझी खात्री आहे कारण तोच भानगडीत सांपडेल आणि तुला तर तो खूपच घाबरतो."

आम्ही चालत चालत, माझ्या घरापर्यंत आलो. मी थांबले आणि हरीरामकडे पाहून म्हणाले, "आता तू जा."

"कां ?"

"कारण एका पुरुषावर मी प्रेम करतेय. आणि त्याच्याशी मला प्रतारणा करायची नाही." मी म्हणाले.







"तूं तर वेश्या आहेस आणि सती सावित्रीचा आव वरा आणतेस" हरीराम माझा हात घट्ट दावत म्हणाला!

मी हात सोडवण्याचा प्रयत्न केला तेव्हां त्याने माझ्या तोंडावर एक ठोसा मारला. माझ्या डोळ्यापुढे काजवे चमकले. मी मान खाली घालून जीना चढू लागले. मी खोलीचा दरवाजा उघडला; वर चढता चढता तो म्हणाला, "देवाने आपल्या दोघांची निर्मिती एकमेकांसाठी केली आहे. मला तुझ्याशी लग्न करायचे आहे."

राजेशनंतर हरीरामनेच, मला लग्नावद्दल विचारले. त्यामुळे मी थोडीशी सुखावले. पण रविकांतवर माझं प्रेम वसलं होतं. त्याच्याशीच मला लग्न करायचे होते.

"मला थोडा वेळ दे विचार करायला."

"ठीक आहे." असं म्हणून तो काहीतरी इराद्याने वसून राहिला. माझ्या शरीरात भीतीचे गोळे उठले. मी म्हणाले, "माझ्याकड यावेळी कोणीतरी येणार आहे. त्याला वाहेरच्या वाहेर घालवायला आईला सांगून मी येते."

आई मशीनवर वसून शिवत होती. मी तिला म्हणाले, "मी काशीवाईकडे, नवलकर लेनमध्ये आहे. तुला जर निरोप द्यायचा असेल तर मला समोरच्या दुकानात फोन कर. मी उद्या सकाळी परत येईन. आणि त्या माणसाने विचारले, "तर मी कुठे गेले ते माहीत नाही म्हणून सांग."

मी काशीवाईकडे जायच्या अगोदर, टॅक्सी पकडली आणि रविकांत ज्या ठिकाणी राहात होता तिथे गेले. रविकांतची चौकशी करताच त्याला पोलिसांनी पकडले असल्याचे कळले. त्याला कां पकडावे हेच माझ्या घ्यानात येईना ! राम म्हात्रेशी कोणताही संबंध ठेवायचा नाही असे मी ठरवले होते; पण आता मला त्याचाच आधार होता. मी सरळ त्याच्याकडे गेले.

"रविकांतला पोलिसांनी पकडले आहे. त्याला तावडतोव सोडव नाहीतर मी तुला किंवा तू मला केव्हाच भेटू शकणार नाही."

तो आश्चर्याने माझ्याकडे पाहू लागला. त्याला काहीच माहिती असल्याचे दिसले नाही. "हा कोण रविकांत?" त्याने विचारले.

"मला वाटले तुला माहीत आहे." मी म्हणाले. आणि मग मी त्याला रविकांतवद्दल त्याच्या माझ्या, संवंधाविषयी थोडक्यात सांगितले.

मी रविकांतवर प्रेम करतेय हे ऐकून त्याला वाईट वाटले. त्याचा चेहरा उतरला.

"घावरू नकोस. तो विद्यार्थी आहे ना, मी शक्य तितका प्रयत्न करीन त्याला सोडवण्याचा." राम म्हणाला.

त्याची मनःस्थिती द्विधा झाली होती. त्याने माझ्याकडे पाहिले. मी त्याला माझे ओठ देऊ केले. त्याने मला थोडा वेळ थांवायला सांगून तो निघून गेला.

राम रविकान्तला सोडवणार याची मला खात्री वाटत होती; पण ह्या मोवदल्यात, तो माझं शरीर मागणार याचीही मला कल्पना होती. आणि ते देण्याची माझी तयारी नव्हती. थोड्याच वेळात राम परतला. त्याचा चेहरा त्रासलेला होता.

"तुझ्या त्या मित्राला अजून पकडलेलं नाही. पण तो पकडला गेला तर त्याला सोडवणं काही मला शक्य होईल असे वाटत नाही. त्याने पोलिसांवर गोळ्या झाडल्या आणि एक पोलिस दवाखान्यात मृत्युशय्येवर आहे."

"तो पोलिसांच्या ताव्यात नाहीतर !" माझा आनंद गगनात मावेना !

"पण तो जर मिळाला तर सुटणे अशक्य आहे."

"तूं रागावलास ?"

"मी रागावलेलो नाही."

"नाही कसा, कारण आता तुला माझ्यावर उपकार करता येणार नाहीत. आणि त्या मोवदल्यात माझ्याकडून काही अपेक्षा करता येत नाही."

आता मात्र खरंच रागावून त्याने खांदे उडवले आणि टेवलावरची घंटा खणाणली. पहिल्याच वाक्यागणिक त्याचा चेहरा उजळला. त्याने टेलिफोन खाली ठेवला. "रविकान्तला शोधण्यासाठी पोलिस तुझ्या घरी गेले असतांना, त्यांना एक वुटका इसम सापडला. त्याने पोलिसांवर गोळीवार केला; आणि तो पळाला आणि रविकान्तला पोलिसांनी त्याच्याच खोलीवर पकडलं."

एकूण काय रविकान्त जेलमध्ये होता. आणि हरीराम माझा कांटा काढण्यासाठी टपला होता. मी अगदी घावरून गेले. माझ्या शरीरात त्राण उरला नाही.

मला वरं नाही असं पाहून राम जवळ आला. त्याने मला खाली वसवलं. "घावरू नकोस. मी स्वतःच रविकान्तला प्रश्न विचारीन. स्वतःच त्याची केस हाताळीन. त्याला सोडवण्याचा शक्य तितका प्रयत्न करीन. ठीक आहे ना !"

"ठीक आहे."

पण त्या दुसऱ्या माणसाचं नाव काय ?

"मला माहीत नाही." मी निघता निघता म्हणाले.

तो मला, वाहेर पडल्यावर खूप वेळ पहात राहिला. आणि मगच त्याने दरवाजा वंद केला.

मी तिथून सरळ काशीवाईच्या घरी गेले. रात्रभर मी तिथेच राहिले. काशीवाईचा गिऱ्हाईक पुरवण्याचा धंदा होता. शिवाय ती आपली जागा भाड्याने देत असे. मी अनेकवेळा तिच्याकडून जागा घेतली होती. मुमताज पण तिच्याकडे येत असे, पण तिचा लोभ माझ्यावरच जास्त होता. मी सकाळी उठायच्या आधीच, आईचा फोन आला. ती घावरली होती. तिने घडलेलं सारं काही सांगितलं. आणि रविकान्त माझी वाट पहात असल्याचेही सांगितलं.

मी घरी गेले. मी जाताच आई म्हणाली, "निदान मला तरी सांगायचं तू पोलिसांना वोलवायला गेलीस."

"मी पोलिसांना वोलवायला गेले नव्हते. हे सारं घडून आलं."

"मलासुद्धा सांगणार नाहीस ! मी काही वाहेर साऱ्यांना सांगणार नाही." आई म्हणाली.

आईला कसं समजवावं हे मला समजेना. "रविकान्त कुठे वसला आहे ?" मी विषय वदलण्यासाठी विचारले.

अनुक्रमणिका

"तो आत बसला आहे."

मी आत गेले. रविकान्तला आलिंगन दिले. रविकान्तला पोलिसांनी सोडवले होते. रामने त्याची केस हाताळली होती आणि रविकान्तने त्याला सारं सांगून टाकलं होतं.जगदीश आणि संजीव या दोन साथीदारांची नावे पण सांगितली. रविकान्तने आज आपण होऊन माझी संगत करण्याची इच्छा व्यक्त केली आणि अर्थातच, मला पाहिजे होतं ते मिळाले. आपल्या दोस्तांची नावे पोलिसांना सांगून आपण त्यांचा विश्वासघात केला, असं त्याला सारखं वाटत होतं. पण मी त्याचं समाधान केलं. *

दुसऱ्या दिवशी मी मुमताजच्या घरी जाण्यासाठी बाहेर पडले. इतक्यात एक पोलिस येऊन त्याने मला पोलिस कमिशनरच्या ऑफिसात बोलावले असल्याचे सांगितले. आमच्या सारख्या लोकांच्यामागे एकदा का पोलिस लागले ते की सुटत नाहीत.मी पोलिस कमिशनरच्या ऑफिसात गेले. पोलिस कमिशनरला मी ओळखत होते. तो पारशी होता. खिलाडू होता. रंगेल होता. त्याने मला अनेक प्रश्न विचारले आणि शेवटी तो एकच प्रश्न मला विचारत होता. त्याचं नाव काय?

"मला माहीत नाही."

"पण तू पोलिसांना बोलवायला गेलीस, असाच त्याचा समज झालाय हे तुला माहीत आहे का ?"

"होय."

"आणि परत तो तुला त्रास देईल असं नाही का वाटत ?"

"वाटतं. मग ?"

"मग त्याचं नाव सांग, त्याला आम्ही पकडू."

"मला त्याचं नांव माहित नाही हे मी अगोदरच सांगितलं. आणि माझ्याकडे येणाऱ्या प्रत्येक गिऱ्हाईकाचं नांव मला ठाऊकच असायला पाहिजे काय ?"

"आम्हाला त्याचं नांव माहित आहे." मला माहीत होतं, तो खोटंच सांगत होता.

"मग मला का विचारतां ? पकडा त्याला." मी जरा रागातच म्हणाले.

"तू आता जा, पण संभाळून रहा." तो म्हणाला.

मी रस्त्यावर आले आणि मला कससंच वाटू लागलं. मला उलटी आल्याचाही भास झाला. मी जवळच्याच इराण्याच्या दुकानात जाऊन चहा प्यायले. माझ्या मनात एक संशय डोकावला. मी तिथून उठले आणि सरळ घराजवळच्या डॉक्टरकडे गेले. मी गरोदर आहे असा मला संशय आला होता.

"डॉक्टर मी गरोदर आहे असा मला संशय आहे."

तो हसू लागला. कारण डॉक्टरला माझा धंदा माहीत होता.

"तुला त्याचं वाईट वाटतं ?" त्यानं विचारलं.

"नाही. उलट मला आनंद झालाय." मी म्हणाले.

त्याने मला अनेक प्रश्न विचारले. आणि नंतर तेलकट मेणकापडाच्या बिछान्यावर झोपवून तपासलं.

"मला संशय होता आणि तो खराखोटा पाहण्यासाठी मी आले होते. मला किती दिवस झाले असतील ?"

"दोन महिने" डॉक्टर म्हणाला. कां ? कोणाचं ते पाहण्यासाठी?"

"मला माहीत आहे कुणाचं ते." असं म्हणून मी बाहेर पडले.

"तुला पुन्हा केव्हा मदत लागली तर ये."

माझ्या मुलाचा बाप कोण असावा याची मला कल्पना होती. रस्त्यावर आल्यावर मी जेव्हा विचार करू लागले तेव्हा माझ्या मुलाचा बाप हरीराम आहे याची खात्री झाली. राजेश, राम, रविकान्त, मनमोहन, कित्येक लोकांशी माझा संबंध आला असला तरी, हरीरामबरोबर त्या काळोख्या रात्री मी एकजीव झाले होते, तितकी कुणाशीच झाले नव्हते.

मी घरी गेले तेव्हा, रविकान्त घरीच होता. त्याचा मूड पण ठीक होता. रविकान्तची जबानी रामने घेतली होती. ती रेकॉर्डमध्ये न जाणे फार महत्त्वाचे होते. नाहीतर रविकान्तचे इतर दोस्तही फसले असते.

दुसरे दिवशी सकाळी, मी रामला फोन केला. रामला मला भेटायची इच्छा होती; का तेही मला माहित होतं. त्याची इच्छा मी अजून भागवली नव्हती.

रविकान्तच्याच पुढ्यात मी त्याला टेलिफोन केला होता.

"तू मला कॅफेमध्ये का भेटत नाही. मी रामला विचारले.

"नाही. तुझ्या घरी किंवा कुठेच नाही." राम म्हणाला.

"रामला माझ्याबरोबर शय्यासुख घ्यायचे आहे." मी रविकान्तला म्हणाले. पण स्त्रीच्या इच्छेविरुद्ध तिचा उपभोग कोणीच घेऊ शकणार नाही."

"पण तू त्याची इच्छा का पूर्ण करीत नाहीस ?" रविकान्तने मला विचारले.

"कारण माझं तुझ्यावर प्रेम आहे."

"जर तू त्याची इच्छा पूर्ण केली नाहीस, तर तो रिपोर्ट फाडणार नाही."

"घाबरू नकोस. तो ते कागद नक्कीच फाडेल."

"पण तू असं कर. त्याला इथं बोलाव. तुझ्या खोलीत तो आला की मी त्याला गोळी घालून ठार मारतो." रवि म्हणाला.

"मेहेरबानी करून असं काही बोलत जाऊ नको." असं बोलत असतानाच मला चक्कर आल्यासारखं झालं.उलटीचा त्रासही झाला.

"मला काही सांगायचंय" मी रवीला म्हणाले.

"काय ?"

"मला गेले काही दिवस बरे वाटत नाही. मी काल डॉक्टरकडे गेले होते.

तो माझ्याकडे काहीवेळ पाहात राहिला. "तू गरोदर आहेस ?" तो म्हणाला.

"होय. आणि ते मूल तुझं आहे."

तो काहीच बोलला नाही.

दरवाजा वाजला.

"तू आतल्या खोलीत जा. राम आला असणार." मी म्हणाले.

मी दरवाजा उघडला. रामच्या ऐवजी हरीराम दारात उभा होता. त्याचे दोन्ही हात कोटाच्या खिशात होते. त्याला पाहून मी दरवाजा

अनुक्रमणिका

बंद केला. त्याने तो आपल्या खांद्याने ढकलला आणि तो आत आला.

"तू का आलास ?"

"तू माझं नाव पोलिसांना कळवलंस."

"नाही. मी पोलिसांना तुझं नाव कळवलं नाही."

"मला इथं ठेवून तू बाहेर का गेलीस ?"

"माझं दुसऱ्या एका माणसावर प्रेम आहे आणि त्याच्याशी मला प्रतारणा करायची नव्हती म्हणून मी बाहेर गेले. आणि पोलिस इथे आले ते दुसऱ्याच माणसाला शोधण्यासाठी. तुमच्यासाठी नव्हे." मी धीर धरून म्हणाले.

तो माझ्याकडे आला आणि त्याने माझे गाल, नाक, कान, वगैरे कुस्करायला सुरवात केली.

"तू स्त्री आहेस म्हणून ! नाहीतर तुझा केव्हाच फडशा पाडला असता."

मला ते असह्य झालं. "चालता हो" मी जोरात किंचाळले. इतक्यात दरवाजा उघडून राम आत आला. मला जरा धीर आला.

"राम, हा माणूस मला त्रास देतोय."

"तुझं नाव काय ? तू या गरीब मुलीला का त्रास देतोस ?" रामने दरडावून विचारले.

हरीराम रामकडे पहात राहिला, आणि तो खिशातून हात काढून चाल करून यण्याआधी रामने त्याला असा ठोसा मारला की तो काळानिळा झाला. रामने त्याला उठायलाच दिले नाही. पुन्हा दोन चार ठोसे जोरात लगावले. हरीराम चुपचाप उठला आणि निघून गेला.

तो गेल्यावर रामने मला विचारले, "कोण होता तो ?"

"मला त्याचं नाव माहित नाही." मी खोटं बोलले.

तो काहीच बोलला नाही. तो जवळ आला आणि त्याने माझ्या अंगाभोवती हात टाकला. "कशी आहेस तू आता ?"

"बरी आहे असं म्हणून मी त्याच्या डोळ्यात पाहिले. त्याने मला त्याच्या जवळ ओढले. मी हळूच त्याला दूर लोटत म्हणाले, "मी तुला फोन केला होता. मला तुझी मदत हवी आहे."

"कसली मदत ?" त्यान विचारले.

"ज्या तरुणाला तू सोडवलंस .

"हां, तो तरुण होय. त्याला मी एकच प्रश्न विचारला, आणि त्याने सारं ओकून टाकलं. त्यानं जर काहीच सांगितलं नसतं तर, माझ्याजवळ काहीच पुरावा राहिला नसता."

"पण तो पुरावा नष्ट का करत नाहीस ?" मी त्याच्या शर्टाची बटणे फिरवत म्हणाले.

"मग ह्या बदल्यांत तू मला काय देशील ?" त्याने मला घट्ट छातीशी धरीत विचारले.

"काही नाही. माझं त्या तरुणावर प्रेम आहे आणि मला आता मूल होणार आहे." मी म्हणाले.

"आणि समज मी तो पुरावा नष्ट करायचं नाकारलं तर ?"

"तर मी फार दुःखी होईन."

"पण तू माझ्याशी चांगली वागशील असं म्हणाली होतीस."

"होय पण मला आता मूल होणार असल्याने मी तो बेत बदलला आहे." मी म्हणाले.

तो प्रथम काहीच बोलला नाही. नंतर माझा हात हातात घेऊन म्हणाला, "माझ्याजवळ कोणताही लिखित पुरावा नाही. तू माझ्यावर विश्वास ठेवून निर्धास्त रहा." असं म्हणून तो निघून गेला.

तो निघून जाताच रविकान्त आत आला. त्याच्या हातात पिस्तूल होतं. "मी राम म्हात्रेला ठार मारायचं ठरवलं होतं."

"असला अविचार करू नकोस. तुझ्याविषयी काहीच पुरावा त्याने लिहून ठेवलेला नाही."

"मी ऐकलं सारं" रवि म्हणाला.

"मग आता तू आत्महत्या करायचा विचार मनातून काढून टाक. तुला आणि तुझ्या मित्राला कसलाच त्रास होणार नाही."मी म्हणाले.

त्यानंतर आम्ही पत्ते खेळू लागलो. पत्ते खेळता खेळता, मला कसली तरी हुरहूर लागून राहिली. राम म्हात्रेचं काही बरंवाईट नक्कीच झालं असलं पाहिजे. मी तावडतोब टॅक्सी केली आणि राम म्हात्रे राहत होता त्या ठिकाणी निघाले. रविकान्तही माझ्याबरोबर होता.

रामच्या घरासमोर खूप गर्दी दिसली. काहीतरी झालं होतं. मी गर्दीतून आत डोकावलं. रस्त्यावर एक प्रेत चादरीने झाकून ठेवलं होतं. पोलिस गर्दी हटवत होते. प्रेताच्या पायातल्या बुटावरून ते रामचं असावं असं वाटतं. मला भोवळ येऊ लागली. मी रविकान्तला शोधू लागले. तो कुठंच सापडेना. मी तशीच घरी परतले.

दुसऱ्या दिवशीच्या वतमानपत्रावरून मला समजलं, हरीरामने रामला, चौथ्या मजल्यावरून खाली फेकलं आणि तो पळून जात असतांना ड्यूटीवरच्या पोलिसाच्या गोळीला बळी पडला होता.

दोन दिवस रविकान्तचा कुठं पत्ता नव्हता. मी पोलिस स्टेशनवर जाऊन चौकशी केली. त्याचा माझ्याकडे असलेला फोटो पण पोलिसांना दिला.

दुसऱ्या दिवशी एक पोलिस इन्स्पेक्टर माझ्या घरी आला, त्याच्या हाती माझ्या नावचं एक पत्र होतं. ते रविकान्तनेच लिहिलं होतं. पत्र उघडून वाचायच्या आधीच त्या इन्स्पेक्टरने रविकान्तने आत्महत्या केल्याचे सांगितले, आणि तो निघून गेला.

एकामागून एक मला धक्के बसत होते. रविकान्तच्या आत्महत्येने माझ्या शरीरातलं त्राण नाहीसं झालं. माझं रडून संपल्यावर जेव्हां माझं डोकं शांत झालं तेव्हा मी ते पत्र उघडलं.

रविकान्तने लिहीलं होतं, "जेव्हा तुला हे पत्र मिळेल तेव्हा मी मेलेला असेन. जरी पोलिसांनी माझी जबानी घेतली नसली तरी, माझ्या मित्रांची मी नावे सांगितली याचे मला दुःख होतंय.त्यामुळेच पोलिसांना आमची नक्षलवादी चळवळ हाणून पाडायला सोपें होईल. माझ्या पार्टीचा मी घात केलाय. मला या जगांत राहण्याचा अधिकार नाही. मी तुझ्यावर प्रेम करत होतो. मी तुला सांगितल्याप्रमाण मी एका श्रीमंत कुटुंबातला आहे. माझे आईबाप सुसंस्कृत आहेत. त्यांना मी पत्र लिहून सारं कळवलं आहे. ते तुझी आणि माझ्या होणाऱ्या मुलाची व्यवस्था करतील. काळजी करू नकोस. माझा वकील मित्र तुला भेटेल, आणि मदत करील."

मी झालेल्या साऱ्या गोष्टी आईला सांगितल्या आणि तिच्या कुशीत मान घालून पुन्हा पुन्हा रडले.

मला आता माझी काळजी नव्हती. माझे मन मात्र मला खात होतं. मूल हरीरामचे असतांना रविकान्तला मी त्याचं मूल म्हणून सांगितलं होतं.

**(समाप्त)**



# कपट

दत्ता कदम

कथाकहाण्यात ऐकलेला भूकंप झाला आणि घरं हादरली... भिंती पडल्या, वासे मोडले. येवढी अफाट भूमी हालली या अनुभवानं मनंही हादरली. कोकणात कधी नव्हे असा हा अनुभव. गावात कुणाचं घर चांगल्या स्थितीत उभं नव्हतं. मुकेपणानं भयभीत नजरेनं गावकऱ्यांनी वाताहतीकडं पाहिलं. एकमेकांकडे पाहिलं. गांवाचा पिढ्यापिढ्यांचा संसार उध्वस्त झाला होता.

गणाचा बम्मू थोडा अक्कलवंत होता. पण गांव त्याला चिटवल म्हणे, कधी वात्रट म्हणे, कधी चावटबोडा. त्याच्या वाडीतले बरेचसे लोक हुम्यादाच्या खोपटा-जवळच्या मळीत बसलेले होते. चेहऱ्यावर भलं थोरलं प्रश्नचिन्ह घेऊन. बम्मूनं पाहिलं, बम्मू जवळ आला. हुम्यादाच्या लगत येऊन बसला. हुम्यादानं त्याच्याकडं बघितल्यासारखं केलं. बम्मू लय अवखळ. त्यानं हुम्यादाकडं पाहिलंच नाही.

कुणीच काही बोलेना. प्रत्येकाच्या तोंडांत फिट्ट मारल्यासारखं. बम्मूला वाटलं आपणच तोंड उघडलं पाहिजे आणि त्यानं तसं केलं....

'च्यामारी अजून हलतंय्' बम्मू म्हणाला.

तरी कुणी बोललं नाही. हुम्यादा एकदा खंकरला.

पुन्हां बम्मू म्हणाला, 'काय अन्ना, तुमची उगवतची पडवी येकदम झोपली..'

अण्णानं त्याच्याकडं पाहिलं आणि आकाशाला नमस्कार केला. पण बोलला नाही.

सगळ्यांच्या मुकेपणाचा बम्मूला अचंबा वाटला. त्याची अक्कल गप बसली नाही... त्यानं सांगितलं, 'आता साली गम्मत व्हयल.'

सगळे त्याच्याकडं बघतच राहिले.. साला जीव जातोय आन गम्मत कसली.

'हुं ?' हुम्यादानं विचारलं.

'च्यामारी सरकार पैसं वाटील आता' बम्मू एकदम घडाडून बोलला.

त्यावरोबर मात्र साऱ्यांची तोंडं उघडली.

'हूं हूं. हूं ?' हुम्यादानं केलं.

''सरकार.. पैसं ?.. खटलंच' अण्णा म्हणाला.

'देयल देयल, सरकार देयल.. पैसं देयल..' गंगोबानं सांगितलं.

'आरं वादल झालं तवां सरकारनं न्हवतं वाटलान ? पैसं ?' किनऱ्या शिरपती म्हणाला.

'व्हंय व्हंय वाटलान वाटलान.. तसंच वाटील. छापायच्या वाटायच्या... भांच्योत नोटाच नोटा.. ह्या खिशात त्या खिशात' भराभर सांगितलं हणम्यानं.

'पन माजं ऐका..' बम्मू म्हणाला.

'आरं बोलल्याखेरीज ?' अण्णा म्हणाला.. नि दोन बोटं तोंडाला लावून फटीतनं पचकन थुंकला.

'वायच धीर खाशीव का नाय ?'

'खातो. सांग.'

'अवो.. वादलातले पैसे कितोसे गावले तुमच्या हातावर ?' बम्मूनं ठसक्यात विचारलं.

'धा पंदरा' अण्णानं सांगितलं.

'व्हंय व्हंय.. धा पंदरा टेकलं सरकारनं.' शिरपतीनं सांगितलं.

'आरं पन पैसं वाटनाऱ्या हपीसरानं हाप किती केलान काय पत्त्या हाय ?' बम्मूनं विचारलं.

'नाय.'

'नाय.. बोलायस काय वाटाय हवं.. तुमी आंगठे दिलेव पन अडीचशे तिनशे त्यानं लंपास केलांन.'

'काय काय बम्म्या म्हनतोस तरी काय?' गंगोबाला नवल वाटलं.

सर्वांनाच.



अनुक्रमणिका







तेव्हा हुम्यादानं मुंडकं हलवून हूं केलं.

'अडीचशं ?'

'तीनशं ?'

'व्हंय व्हंय माज्या बाच्चांन. आरं पावतीची तिकिटं लोकांनी अवो विकली. . येकंक दोन रुपायाला.. साला लुटायचं लुटायचं म्हंजे तरी किती..'

'किती ? वग वरी शिरपत्या' वम्मूच्या म्हणण्यावर गंगोवा म्हणाला.

'हूं' हुम्यादानं आवाज काढला.

'तवां आतां डोल्यांत त्याल घालून पायलं पायजे !

'आरं वम्म्या तू ढिग वगशील पन दिसायास हंव ना.' हणम्या म्हणाला.

'आरं झक्कत दिसलं. या वम्म्याचं डोले काय मेलेले नायत. लोकशाय का काय म्हनतात ती हाय आता...'

'म्येला म्हनतेला लोकशाय... कसली कर्माची लोकशाय ? पायात नाय पाय . . . साऱ्या हायचं व्हतंय नाय.. आन म्हनं लोकशाय..' अण्णा डाफरला.

हुम्यादानं हुं हुं केलं.

'तुमचं म्हननं तरी काय ?' वम्मूनं विचारलं.

'आरं हिथं कुटून काय कुटला व्हायाचाय ? काय करायचं त्यासाटनं मानकऱ्याकडं जाव चला.. तं काय तं सांगितलं..'

साऱ्यांनी अण्णाच्या म्हणण्याला तय दिला.

सगळे उठले. मानकऱ्याकडं आले. मानकऱ्यानं कपाळाला जरा आठीच घातली. त्याचं घर शाबूत होतं. पण खांबाला धरून अर्ध्यापर्यंत भिंती सुटल्या होत्या. मानकऱ्यानं त्यांना विचारलंसुद्धां नाही. आपल्याच गुर्मीत भिंतीकडे बघत राहिला.

सगळेजण मुक्यानं घोळक्यासारखे उभे राहिले.

कोणीच काही बोलेना म्हणून मग वम्मूनंच साद घातली, 'वो नानानू ?'

मानकऱ्यानं वळून पाहिलं. म्हणाला, 'का रे बाबानो ? पारधी विरवीला जाताय का काय ?'

**'. . . फसवताय कशास लोकास्नी . . . दाखवा गाडगं . . . गाडगं पण दिसंल, ताक पण दिसंल . . .' गुणवंत मास्तरानं रोखठोक आव्हान दिलं . . .**

तरी कुणी काही बोललं नाही. एकमेकांकडं पाहिलं नि मानकऱ्याकडं बघत राहिले.

मानकरी ओरडला, 'काय रे रांडेच्यांनू. वाचा गेली ?' अण्णानं नाही करून मान हलवली. त्याचं बघून आणखी काहींनी.

'मग बोला रांडेच्यांनू.. घरंविरं बेस हायत नां ?"

'तुमचं येकदम फस्टकल्लास दिसतंय..' वम्मू म्हणाला.

त्यावरोबर हुम्यादानं त्याला चापलं; 'चूप.. म्येला भकतेला. कुनाशी बोलतोयस?'

'मानकऱ्यांशी' वम्मू अधिक धिटाईनं म्हणाला.

'ऐ हुम्या गांवकर.. या काटर्याची चाक उतरायला हवेय काय ? कां त्याला हलवून टाकू..?' मानकऱ्यानं विचारलं.

'चावटवोडा पोर तो. त्याचं काय मनावर घेताव ?' हुम्यादानं तोंड उघडलं.

'तर मग त्या काटर्याला आवरा. नायतर माज्याशी गाठ हाय' मानकऱ्यानं सांगितलं.

त्यावर वम्मू एकदम ओरडला; 'अवो याक कोंबडं, दोन आंडी, आन आख्खी वाटली.. का झाला न्याय... काय मोटी दौलत...'

मानकऱ्याचे डोळे इंगळचागत झाले. हनुवटी घडवड उडायला लागली.

वाट लागली म्हणत अण्णानं वम्मूच्या तोंडावर हात ठेवला, त्याला मागे खेचला वकोटी धरून. हुम्यादानंसुद्धा तोंडातच वडवडून अण्णाला मदत केली.

गंगोवानं तंबी दिली, 'खबरदार तोंडातनं सबुद काडशील तर.. मसन्याला कुटं काय बोलायचं अजून समजत नाय.. डांबीस..'

ओठ चावीत वम्मू सर्वांच्या मागे उभा राहिला.

मग मानकऱ्याला अण्णा म्हणाला, 'पाया पडतांव.. मापी करा नानानू..'

'अरे तुमच्याकडे बघून विचार पडतो. बरं कां आला होता ?' मानकऱ्यानं साळसुदीनं विचारलं.

'ह्या हालतं ह्यं काय ?' गंगोवानं विचारलं.

'त्याचा मी डाक्टर नाय का भगत नाय. हा भूतमारका कुठला ह्यं काय मी सांगू ! पण हाय दांडगा.'

'तं वो, कायच्या काय दांडगा, आमचं याकपन खोपाट उभं नाय, जल्मातनं उटलेलं.' अण्णा म्हणाला.

'अजून जिते कसे आसं वाटतं 'शिरपती बोलला.

हुम्यादानं केलं, 'हूं हूं..'

'पावसानं भिजवलं तर फिर्याद कुणाकडं . .तसंच ह्यं... ह्याला अपील नाय...' मानकऱ्यानं खुलासा केला.

आणि सगळ्यांनी माना डोलावल्या.

तरी मागच्या वम्मूला करंट आला, 'आरं सरकारपाशी अपील हाय.. पैसं वाटील पैसं... तं वोलायस आलेव नं भलतं सलतं वोलताव..' अगदी एका दमात बोलला.

'रांडेच्याला अक्कल हाय' मानकरी हसत बोलला.

'पन घोडयाच्या फुडं आन गाढवाच्या मागं...' गंगोबा म्हणाला नि मोठ्यानं हसला.

'मला पण वाटतं सरकार पैसं वाटील.' मानकऱ्यानं स्वतःचं मत सांगितलं.

'आन मला येडझवा ठरवतांव' वम्मू ओरडला.

'मसन्या गप ऱ्हायस काय घेशील ?'' गंगोवानं विचारलं.

तात्काळ वम्मू म्हणाला, ''पैसं.''

मानकरी त्यावर खदखदून हसला.. म्हणून मग सगळे हसले.

मानकरी गंभीर झाल्यावर सगळे गंभीर झाले.








'काय तरी इच्यार करायस हवा नानानूं..' हुम्यादा.

'कसला ?'

'सरकारानं पैसं वाटलं ऽऽ तर ऽ'

'तर काय ?'

'अवो वादलात नोटा उडाल्या त्या हपीसराच्या खिशात पडल्या..' बम्मू ओरडला.

तितक्याच जोरात अण्णा ओरडला, 'कर्म्या गप बस.. अख्ख्या दुनियेची अक्कल हाय नानास्नी..'

'मी नाय म्हनत नाय.' बम्मूनं हसून सांगितलं.

'झडी लागली रं तुज्या तोंडाला..' गंगोबा उखडला.

बम्मू नाकपुडचा फुगवून निमूट झाला. चित्कारला, 'च्यामारीऽऽ' मानकरी मुंडकं हलवीत म्हणाला, 'शिच्याची वादी' आवळायस हवेय वाटतं...'

'मनावर घेव नका नानानू' अण्णा म्हणाला.

हुम्यादानं हूं हूं केलं.

'काय करणार.. तुमचा विचार पडतो. आ ऽऽ सरकार पैसं वाटील पण ठेवील दरेकाच्या हातावर आठ धा रुपये...'

'घ्यायाचे ?' अण्णानं विचारलं.

'काय म्हनून ? काय भीक लागलेय का काय आमाला !' नरडं फुगवून हुणम्या म्हणाला.

आणि त्याचं बोलणं सगळ्यांनी उचलून धरलं.

'ते खरंच. आम्ही उपरे नाही. पिढ्या-पिढ्यांचे वतनदार आहोत.. सरकार काल परवाचं.. फार तर पाच वर्षांचं.. कसं ?' मानकऱ्यानं सवाल केला.

'तुमच्याफुडं आमी काय बोलनार..' शिरपती म्हणाला.

'बोलायलाच नको. आमच्या मान-कऱ्यांचा सबूद म्हंजे धरमदेवाचा लेख..' अण्णा म्हणाला.

ते 'सारं ऐकून मानकऱ्याचा गडदा जरा जादा फुगला. म्हणाला, 'आसं बघा.'

'काय ?'

'आठ धा..धा पंधरा हातावर टेकलान सरकारानं तर पैसे घ्यायचेच नाहीत.'

'हयंच खरं.'

''वादळातलं वाटप हाय आमाला म्हायत. आमी बी हुशार झालोय.'

'तर वो.'

'शेकड्यांत दिले तरच घ्यायचे.'

'बरोबर.. धा पंदरात काय खोपाट उबं व्हनार हाय ?'

'पण एकी कायम पाहिजे.'

'येकदम.

'ठणकावून.. सांगितलं पाहिजे.'

'हाँ हाँ.. येवस्थीत..'

'कोण फुटता कामा नये.'

'अवो नानानू.. नाय नाय नाय...'

त्यावर काही दिवसच गेले आणि सर-कारी मदत घेऊन गावात हपीसर आला. आला तो पहिल्यानं मानकऱ्याकडं.. मान-कऱ्याच्या ओटीवर बसूनच त्यानं गाव-कऱ्यांच्या नुकसानीची यादी केली. घर साफ पडल्याने प्रत्येकाची नुकसान अचाट झालेलं होतं. कुणाच्या नावावर.. दहा तर कुणाच्या नावावर पंधरा. हपीसरानं मानकऱ्याच्या नावावर वीस रुपये टाकले. जसा देवा धर्माचा मानकरी तोच, तसा पोलीसपाटील पण तोच.

मानकऱ्यानं यादी वाचली आणि कागद खाली ठेवून सांगितलं, 'ही भीक कशाला? कर देतो भीक घ्यायला ? पाच धा रुपय गावातला कोण परच्छिन घेणार नाही. तुमी उठा आनं तालुक्याची वाट धरा.'

हपीसर म्हणाला, 'राज्य कसलंही येवो कुणाचंही येवो. लोक खुळेच असतात. त्यांना काय कळतंय.. कळणारही नाही.. माझं आपलं जरा खाजगी बोलणं.. लोकांचा एवढा पुळका घेऊन लोक तुम्हाला पोस-णारायत ? हे बघा..' आणि त्यानं वीसावर पुढं एक शून्य देऊन सांगितलं, 'झालं समा-धान तुमचं ?'

'दोनशे ?'

'हो हो.. आता समजवा सगळ्यांना, काय ? अहो त्यांना आकाश फाडून दिलं तरी पुरणार नाय.. तुम्ही काय त्यातले आधाशी आहात ?'

'छट् ?'

मानकऱ्यानं मुंडकं हलवलं. वर्दी देऊन गाव जमवला. झाडून सारे जमले. भूकंप झाल्याने मुंबईकर आले होते तेही जमले. मानकऱ्याचं अंगण खच्चून भरलं. भूकंपाच्या संकटाबद्दल हपीसरानं खोटं सांत्वन केलं आणि एका वाडीची मदतीची यादी वाचून दाखवली. त्याच वाडीतला मुंबईस असणारा गिरणीतला गुणवंत मास्तर ती यादी ऐकून चक्रावला. धा-पंधरा रुपये हातावर टेकले तर घ्यायचे नाहीत ही झालेली भाषा त्याला कळलेली होती.. खोटेपणानं हट्टानं अधिक पैसे घ्यायचे होते असं नव्हे तर दरेकाचं नुकसानच भयानक झालं होतं.

मानकऱ्यानं सांगितलं, 'बाबांनो, सरकार तरी कुणाला पुरं पडणार ? आमच्यासारखे संकटग्रस्त लाखो लोक आहेत. मोठं मन करून मिळालंय त्यावरंच समाधान मानायला हवं.

'धा पंदरा रुपय येका दाताला तरी पुरतील काय ?' गणाचा बम्मू उसळून ओरडला.

त्याच्या अपितारी ओरडण्याचा मान-कऱ्याला संताप झाला, 'अरं हुम्या गावकर, त्या पोराला डबरीत नेवन घाल.'

हुम्यादानं अण्णाकडं पाहिलं. अण्णा उठला. बम्मूजवळ जाऊन बसला. म्हणाला, 'रांडंच्या नरडं आवळून ठेव.'

बम्मूनं त्याच्याकडं बघून हनुवटी उचलून दाखवली. गुणवंत मास्तरचं तिकडं पुरतं लक्ष होतं. त्यानं सारं ऐकलं, पाहिलं.

पुन्हां मानकरी म्हणाला, 'बाबानों, मिळालंय हेच थोर..' मानकरी पुढं काही बोलणार तोच गुणवंत मास्तरानं उठून हपीसरला विचारलं, 'या ओटीवर बसून तुमी लोकांचं नुकसान पाह्यलंत, मदतीची यादी केलीत...'

ते ऐकून हपीसरापेक्षा मानकऱ्याच्या अंगाची लाही झाली. तो एकदम म्हणाला,

(पान ५० वर)

# तीन नाटके—

## कानडी (मराठी), हिंदी आणि जुने (नवे)

नाटकांना सध्या उधाण आले आहे. मराठी नाटकांच्या क्षेत्रात ती नाटके जणु कमी पडतात म्हणून की काय काही कानडी, बंगाली नाटकेही आता दिमतीला आली आहेत. या कानडी, बंगाली नाटकांच्या हिंदी, मराठी आवृत्त्या पाहण्याचा योग अलिकडेच आला. नाटककारही गाजलेले—आपल्या मूळ भाषेच्या क्षेत्रात—त्यामुळे साहजिकच अपेक्षाही वाढलेल्या. बादल सरकार आणि गिरीश कर्नाड ही ती दोन नांवे. बादल सरकार हें नांव तूर्त मुंबई प्रांती अधिक गाजले आहे. इतके की हा टोपण नाव घेतलेला मराठी लेखकच वाटावा. असो.

"ययाती" हे कर्नाड यांचे मूळ कानडी नाटक ! त्याचा अनुवाद श्री. श्री. र. भिडे यांनी केला होता. प्रयोग सादर केला 'अभिव्यक्ती' ह्या नाटचसंस्थेने ! 'अभिव्यक्ती'नेच म. गांधी खुनावर आधारित 'पाच वाजून पाच मिनिटांनी' हे नाटक सादर केले होते. तेही असेच अनुवादित नाटक होते. आणि हेही असेच अनुवादित नाटक ! अलिकडे रंगमंचावर येणारी ही बहुसंख्य अनुवादित, रूपांतरीत, भाषांतरीत नाटकांची संख्या पाहिली की स्वतंत्र, चांगल्या मराठी नाटकांचे दुर्भिक्ष्य जाणवते व मन काहीसे अस्वस्थ होते.

'ययाती'ची कथा तशी जुनी, पौराणिक. पण पौराणिक कथातूनही आजचे कलाकार काही वेगवेगळे भावार्थ काढू शकतात. 'ययाती' ही खांडेकरी कादंबरी, 'ययाती आणि देवयानी' हे शिरवाडकरांचे नाटक हे असेच दोन प्रयत्न. गिरीश कर्नाड यांचा आणखी एक नवा प्रयत्न. या नाटकातली प्रामुख्याने ययातीवरच आपले लक्ष केंद्रित करते आणि देवयानीचा अहंकार. त्या अहंकारातून जन्म पावलेला शर्मिष्ठेविषयीचा द्वेष, सूडभावना. त्यातून ययातीचा शर्मिष्ठेला दूर करण्याचा प्रयत्न, तिची व्यथा ऐकल्यानंतर त्याचा झालेला वृत्तिपालट, तिच्या खोल अशा भावनांनी आणि ययातीच्या वृत्तिसुलभ कामुकतेने ययाति—शर्मिष्ठा जवळ येतात. देवयानी निघून जाते. तिच्या अहंकाराच्या तृप्तीसाठी शुक्राचार्य ययातीला शाप देतात. मुदत असते सूर्यास्ताची ! ययातीचे वार्धक्य घ्यायला कुणी तयार झाला तरच ते टळणार होते. पुरूने ते वार्धक्य घेतले अशी कथा साऱ्यांना ठाऊक आहे. परंतु प्रस्तुत नाटकात देवयानी निघून गेल्यानंतर भर दिला गेला आहे तो पुरू—ययाती, ययाती—शर्मिष्ठा यांच्या मनांतील संघर्षांवर ! पुरूची एक वेगळीच व्यक्तिरेखा, त्याच्या मनातील खोलवर रुजलेले प्रश्न, अंतःसंघर्ष यांचे एक वेगळच दर्शन इथे घडते. इथे पुरू—ययाती संघर्षाला जी पातळी लाभलेली आहे ती मनोज्ञ आहे. ययातीची तुफान कामवासना, त्याचे वार्धक्य स्वीकारायला कुणीही तयार होत नाही याचे सूचन, ययाती—पुरू ययाती शर्मिष्ठा, ययाती व पुरुपत्नीचा प्रवेश, शर्मिष्ठेच्या रूपाने ययातीच्या पाठीशी उभी राहिलेली समर्पित प्रीती, विवेकबुद्धी हा



या नाटकातला चांगला भाग. सुटसुटितपणा हे त्याचे दुसरे मोठे वैशिष्टच. अपवाद फक्त दासीच्या आत्मकथनाचा ! पुरू आपल्या तारुण्याचा त्याग करुन पित्याचे वार्धक्य घ्यायला तयार होतो. त्यावेळी त्याची पत्नी प्रभावित होते. त्याचे हे कृत्य त्याच्याविषयीचा आदर वाढविते. त्या भारावलेल्या भावनेने ती त्याला सामोरी जाते. दचकून किंचाळते. पंचारतीचे तबक उधळले जाते. आणि नंतर ती विषप्राशन करून घेते. इथपर्यंतचे लेखनही हृद्य झाले आहे.

मराठी अनुवादाबाबत थोडक्यात असे म्हणता येईल की, तो निर्जिव-भाषांतररूपच आहे. मराठीचा रंगढंग. गोडवा त्या अनुवादाला लाभला असता तर—– सूत्रधाराच्या प्रास्ताविकाचा परिणाम तर शून्य केवळ शून्यच म्हणावा लागेल. ययाती पुरू यांच्यामधील अखरच्या अंकातील (खरं तर प्रवेश) संथपणा असेच सहज सुंदर झालेले नाही.

प्रयोगदृष्टचा एक गोष्ट सांगितली पाहिजे की 'ययाती'ची हिंदी आवृत्ती दिग्दर्शित करणाऱ्या श्री. सत्यदेव दुबे यांनीच हे नाटक दिग्दर्शित केले आहे. हे नाटक पाहताना एक महत्वाचा प्रत्यय घेतला तो असा की नाटच व नाटचगत संघर्ष जर प्रभावी असेल तर नेपथ्यादि बाह्य उपचारांकडे लक्षही जात नाही. ह्या नाटकात, ते राजा, युवराज, राणी वगैरेंवर आधारित असूनही नेत्रदीपक नेपथ्य नाही. आणि तरीही नाटकाच्या रंगतीवर, परिणामावर काही उणेपण येत नाही. रंगमंचावर प्रभावीपणे व परिणामकारकतेने नजरेत भरतो तो रक्तस्तंभ ! ययातीची धगधगती वासना सूचित करणारा ! बाकी नेपथ्याचा घोळ नाही. ययाती, पुरू, देवयानी हे साजेशा पोषाखात. तर शर्मिष्ठा मात्र काहीशा आगळचा वेषभूषेत दिसते. शर्मिष्ठचे ते रूप अपरिहार्य होते काय ? मला तसे वाटत नाही. पण नाटचगत संघर्षामुळे, रेखीवपणामुळे, ह्या साऱ्या गोष्टी गौणच ठरतात.

डॉ. श्रीराम लागू यानी 'ययाती'चे संघर्ष चांगले सादर केले. देवयानी, शर्मिष्ठा, पुरु व पुरुपत्नी ह्या चौघांशी चार प्रकाराने त्याचा संबंध येतो. विविध भावस्थिती सूचित करणारा. लागू त्यातले बारकावे चांगले पेश करतात. काम, क्रोध, अगतिकता, उद्वेग आणि 'वार्धक्या'च्या चिंतेने ग्रस्त झालेली ययातीची भयाकुल, विव्हल मनःस्थिती ह्या भावना डॉ. लागू यथार्थपणे उभ्या करतात. देवयानीचा क्रोध, फणकारा सुनील प्रधानांनी चांगला दाखविला. सुलभा देशपांडे ही एक समर्थ अभिनेत्री. तिच्या विविध भूमिका मी पाहिलेल्या. प्रस्तुत नाटकातील शर्मिष्ठा त्या ताकदीने उभ्या











अनुक्रमणिका

करतात. त्या पोषाखात त्या शर्मिष्ठा वाटल्या नाहीत. पण भाव-दर्शनातून, हालचालीतून त्या ते उणेपण भरून काढतात. पुरुपत्नी रेखा सवनीस ह्यांना एकच प्रवेश लाभतो. त्याला त्या न्याय देतात. प्रभाकर पाटणकर यांचा पुरू का कुणास ठाऊक आपला प्रभाव पाडू शकला नाही. त्यांची बोलण्याची पद्धत 'एकसुरी' वाटली. 'कोरडी वाटली. त्याच्या व्यथा व्यक्त करतानासुद्धा ती उत्कट झाली नाही. खरं तर पाटणकर हे आजचे एक गुणी नट ! मी मानतो. पण ह्या नाटकाला पुरू रुचला, पटला नाही. भूमिकेची जात वेगळी असेल, पण नटाला ही आव्हानेच असतात, नाही का ? एक अवघड भूमिका त्यांनी पेश केली. खटकले ते लिहिले इतकेच.

संगीतादि साजशिणगार नसतानाही हा कन्नड 'ययाती' मराठी प्रेक्षकांना आवडेल इतका समर्थ आहे. नाटयगणसंपन्न आहे.

## हिंदी 'पगला घोडा'

**सत्यदेव दुबे** दिग्दर्शित व **बादल सरकार** लिखित असे हे मूळ बंगाली नाटक हिंदी रूप धारण करून मराठी हिंदी प्रेक्षकांसमोर आले आहे. वल्लभपूरची दंतकथा, बाकी इतिहास (मराठी) व एवम् इंद्रजित (हिंदी) ह्या नाटकापाठोपाठ हा 'पगला घोडा' मुंबईकरांपुढे आला आहे. बादल सरकार ह्या नाटककाराची एकूण प्रकृति गंभीरच ! जीवनाचा विचार करायला लावणारी–स्वतः करणारी ! बादल सरकार हे बंगालीतील एक प्रयोगशील नाटककार आहेत. ह्या प्रयोगात बाह्य माध्यम नवीन असले तरी विचार मात्र असतो जीवनातील सनातनाचा, शाश्वताचा ! 'पगला घोडा'ह्या नावाने होणारी प्रतिक्रिया विनोदी स्वरूपाची असली तरी नाटकात मात्र जाणून बुजून विनोद नाही. पार्श्वभूमी स्मशानाची. एक प्रेत–स्त्रीचे-जळते आहे आणि तिला पोहचवायला आलेली चार माणसे घाटावर बसलेली आहेत. स्मशानात माणसाला गांभीर्य येते. मग ते टाळण्या-साठी टाइम किलिंग, त्यासाठी गप्पा, पत्ते (आणि इथे तर मद्यही) आदि गोष्टी ! चितेवर जळत असलेल्या स्त्रीच्या संबंधी गप्पा सुरू होतात आणि मग अवघे स्त्रीत्वच जणु चर्चाविषय होते. चर्चा करणाऱ्या प्रत्येक माणसाचे काहीतरी स्त्रीविषयक गूढ आहे. ते गूढ एकमेकांपासून लपविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. आणि ते सत्य बदलायला लावण्याचा त्या प्रतीकरूप–स्मृतिरूप अशा स्त्रीचा प्रयत्न आहे. प्रत्येक पुरुषाची स्त्री जणु तेथे येते आणि त्यांच्या मनातला विवेक जागा करून त्यांच्या मुखातून लपवून ठेवलेले सत्य बाहेर काढते ही कल्पनाच मला मनोज्ञ वाटते. मृत्यूच्या आमनेसामने माणसांचे मुखवटे गळून पडतात आणि त्यांच्या खऱ्या भावभावना, श्रद्धा, निष्ठा, व्यथावेदना यांचे सुंदर (वा कुरुप) पण उघडेनागडे दर्शन घडते. स्मशानाच्या पार्श्वभूमीवर कार्तिक, सातू, हेमाद्री आणि शशी ह्यांच्या कथा आणि व्यथा त्यांच्यातल्या विवेकी माणसामुळे बोलक्या होतात. त्यांच्यातल्या पगल्या घोड्याने वेग-वेगळ्या संदर्भात चार स्त्रियांचे जीवन कसे उध्वस्त केले याची हृदयाला हलवून सोडणारी कहाणी उलगडत जाते. त्या स्मृतिरूप–प्रतीकरूप स्त्रीच्या तोंडात नाटककाराने लोकगीत वारंवार घातले आहे ते खालीलप्रमाणे

''आम का पत्ता जोडा जोडा, मारा चाबुक दौडा घोडा
छोड रास्ता, खडी हो बीबी, आता है यह पगला घोडा''

स्त्रीच्या पुरुषशरण जीवनाचे विदारक दर्शन नाटक घडविते. यातला प्रत्येक पुरुष 'पुरुष' आहे आणि सहृदय माणूसही. त्यांच्या कथा तशा असामान्य नाहीत पण त्या सामान्य कथातून सूचित केलेली उध्वस्त स्त्री–पुरुष प्रीतीची, संबंधांची कथा मान्य असामान्य-पणे विद्ध करून जाते. कार्तिक बाबूचे अखेरच्या प्रवेशातले भाषण तर टाळचा घेते. माणसे हलतात आणि मनांचे उन्नयन (सब्लिमेशन) होते. माणसातला विवेक त्याच्याजवळच असतो हे सूचित करण्या-साठी केलेला स्त्रीचा वापर बादल सरकार यांच्या समर्थ नाट्य-प्रतिभेची साक्ष घडवितो.

प्रस्तुत प्रयोगातल्या त्या स्मृतिरूप, प्रतीकरूप, विवेकरूप स्त्रीची भूमिका तरल मेहता ह्या अभिनेत्रीने केली. तिला चार स्त्रियांच्या भूमिका करायच्या होत्या–वेगवेगळ्या आणि तरीही एकात्म, शोकांत ! क्षणाक्षणाला बदलते भाव, बदलती बाह्याभिव्यक्ति, हालचाल, बोलणे, वागणे, उभे राहणे वगैरे सर्वच भिन्न ! ती ती भूमिका तरल मेहता हिने उभी केली. ते एक आव्हानच होते. अजूनही हालचाली, चालणे बोलणे यातून विविधता दाखविणे शक्य आहे. काही ठिकाणी एकसुरीपणा जाणवतो. पुरुष भूमिकात अमरीश पुरी (कार्तिक बाबू) साऱ्यांना खाऊन टाकतात. अमोल पालेकर (हिमाद्री) सुरेन फातर्फेकर (सातू) गजानन बंगेरा (शशी) यांच्या भूमिका बऱ्या झाल्या इतकेच ! फातर्फेकर, बंगेरा कमी पडले. अमरीश पुरींच्या पुढे तर फारच ! नाटक प्रकृतीने गंभीर. पण या चौघांच्या चार तऱ्हेच्या बोलण्यातून मात्र नाटकभर हंशा होतच राहतो. हे तसे अवघड. एकीकडे विद्ध करणारे नाटक हसवीत(ही) राहते ही तशी किमयाच नव्हे काय ?

## सं. पाणिग्रहण

कै. आचार्य अत्रे यांचे ''पाणिग्रहण'' नाटक नव्या संचात व नव्या संगीत साजात रंगमंचावर आले आहे. निर्माती संस्था–अत्रे थिएटर्स प्रा. लि. नाट्यवास्तूबद्दल नव्याने काय लिहिणार ! प्रयोगाबाबत असे म्हणता येईल की, बापूराव माने हे स्त्रीपार्टी नटच आहेत हे प्रभावीपणे, पुन्हा सिद्ध झाले (मला त्यांची एकही पुरुष भूमिका आवडलेली नाही. स्त्रीभूमिका मात्र मी १९३९ पासून पहात आलो आहे) बकुल पंडित अजून रुळायच्या हव्यात. पहिले गाणे रंगले. विश्वनाथ बागूल यांची गाणी बरी झाली. रंगली नाहीत. बाबा वैशंपायन झकास, बेबी पद्मश्री एक चांगली बाल नटी होऊ शकेल याची ग्वाही मिळते. भाऊ विवलकर, ललिता कारेकर ठीक ठीक ! हे पुनरुज्जीवन कितपत तारक ठरेल हे सांगणे त्यादिवशीच्या (पहिल्या) अनुभवावरून तरी कठिण वाटते. काही जुनी नाटके अलिकडे रंगमंचावर येत आहेत. त्या साऱ्यांच्या ह्या नव्या प्रयोगां-बद्दल स्वतंत्रपणे लिहायला हवे आहे.

**—चित्रगुप्त**

## एक यशस्वी कादंबरी

खरंखुरं, आंतरिक, उत्कट प्रेम हे माणसाला उत्कर्षाप्रत नेत असते. सदैव उत्कर्षाचीच कांक्षा धरीत असते. आपल्या प्रियकरातला उपजत कलावंत हेरून त्याच्या अभिवृद्धीसाठी स्वतःचे प्रम अव्यक्त ठेवणाऱ्या, स्वतःचे मन मारणाऱ्या, एका उदात्त मनस्वीनीचे दर्शन सिद्धहस्त लेखक श्री. प्रभाकर अत्रे यांच्या 'मुक्त मी ! वंदिस्त मी ! !' या नव्या कादंबरीत होते.

जयंत कारखानीस. सुरेल, गोड गळ्याची निसर्गदत्त देणगी मिळालेला एक उमदा तरुण. एकटा. आई लहानपणीच वारलेली. वडील डॉक्टर पण संगीताचे शौकिन. त्यांचेही छत्र फार काळ लाभले नाही. कॉलेजातील एका समारंभात गायल्यामुळे जयंताचे अंगभूत कसब दिसून येते. त्याचे अभिनंदन करायला येणाऱ्या प्रेमा विवलकरशी त्याची ओळख होते. तीही गाण्याची दर्दी असते. स्वतःही गात असते. दोन कलासक्त, समानधर्मी तरुण जीव एकत्र येतात. स्नेह वाढतो. नाजुक धागे केव्हा विणले जातात समजतच नाही. आणि.... आणि प्रेमा नकार देते. अचानक परकेपण पांघरते. केवळ एका रसिकाच्या भूमिकेतून निर्मळ मनानेच आपण वागलो, आपल्या मनात 'तसे' काही नव्हते आणि नाही असे म्हणते. मोठा कलावंत होण्याचा उपदेश साळसूदपणे जयंतला करते आणि इथेच तो विथरतो. जगात अखेर सुरांचीच साथ सच्ची आहे असे मानून त्यांचीच आराधना करायचे ठरवतो. मोठा कलाकार होण्याचा निश्चय करतो नि इंदूरला निघून जातो. तिथे एका गुरुकडे खूप खूप साधना करतो. अखेर त्याचे ईप्सित साध्य होते. एक मोठा गायक म्हणून त्याला मान्यता मिळते. अखिल भारतीय कीर्तीच्या गायकांच्या एका जाहीर मैफलीत गाण्याचे त्याला आमंत्रण येते. ह्या संगीत समेला प्रेमा हजर असायला हवी असे त्याला उत्कटतेने वाटते. कार्यक्रमानंतर अनेक जण त्याचे भरघोस अभिनंदन करून त्याच्या मोठेपणाची पावती देतात. आणि... आणि शेवटी प्रेमाही त्याचे अभिनंदन करायला येते. कारण तीही त्या संगीत सभेस हजर असते. अखेर सारे अपसमज दूर होतात. आणि त्यांचे मधुर मीलन होते.

कादंबरी आकाराने लहान आहे; परंतु कोणत्याही कादंबरीचे यशापयश हे तिच्या आकारमानावर अवलंबून नसते. त्याचे निकष वेगळ असते. वाचकाला ती एक कलात्मक आनंद देते की नाही हा एक प्रमुख निकष मानला तर प्रस्तुत कादंबरी बऱ्याच अंशी या कसोटीस उतरेल यात संशय नाही. एका वेगळ्या विश्वात ही कादंबरी आपणास घेऊन जाते व एक उच्च प्रतीचा आनंद प्रदान करते.

एका उदयोन्मुख गायकाचा प्रख्यात गायक होईपर्यंतचा त्याच्या संगीतकलेच्या आराधनेचा प्रवास श्री. अत्रे यांनी कोणतीही गुंतागुंत निर्माण न करता सहजतेने आपणासमोर उलगडला आहे. प्रेमा विवलकर जेव्हा त्याच्या जगात नि मनात प्रवेशते व तिच्या नकारातून प्रेरणा घेऊन तो एक मोठा गवय्या होतो आणि अखेर ती येऊन त्याला मिळपर्यंतचा त्याच्या मानसिक स्थित्यंतराचा पट नितळ पाण्याखालील भूपृष्ठभाग दिसावा, तसा स्पष्ट दिसतो हे; श्री. अत्र्यांच्या सिद्धहस्त लेखनकौशल्याचे गमक आहे. आणि हे या कादंबरीचे सर्वात मोठे यश म्हणता येईल.

—कृष्णा घाळिंजकर

('मुक्त मी ! वंदिस्त मी ! !' ले.—प्रभाकर अत्रे, जयश्री पब्लिकेशन्स, किंमत ३ रुपये.)




**मुक्त मी ! वंदीस्त मी !! • युगवाणी • मर्तिक...मरतिक**

## 'युगवाणी'चा अविस्मरणीय 'कोल्हटकर' विशेषांक

नागपूरच्या 'युगवाणी' मासिकाने खास श्रीपाद कृष्ण कोल्हटकर विशेषांक काढला आहे तो अप्रतिम असून कोल्टकर वाङ्मय—प्रेमिकांना जणू मेजवानीच वाटावी इतका दर्जेदार आहे. श्रीपाद कृष्णांचे प्रीतीपात्र अन् मराठीतल्या पहिल्या स्त्री नाटककार श्रीमती हिराबाई पेडणेकर, कोल्हटकरांच्या पत्नी, कोल्हटकरांची निवासस्थाने, कोल्हटकर, गडकरी, गुर्जर अन् मनोरंजनचे संपादक मित्र, आणि बालकवि ठोमरे वगैरेंचे एकत्र छायाचित्र, हिराबाई अन् त्यांचे शेठ श्री. कृ. ना. नेने अशी आर्ट पेपरवरील आठ अस्सल छाया चित्रे देऊन संपादकांनी या खास अंकाची शोभा आणखीनच वाढविली आहे. 'पुणेकर' या टोपण नावाने लिहिलेला पु. रा. लेले यांचा पुनर्मुद्रित लेख गडकरी-अत्रे भेटीवर प्रकाश पाडणारा आहे. लेल्यांनी या संबंधात माडखोलकरांना पाठविलेली बारा पत्रे ही देखील अत्रे-गडकरी भक्तांना मोठेच खाद्य वाटणारी ठरावीत. कोल्हटकरांच्या मजेदार आठवणींनी अंक सजला असून त्यातून श्रीपाद कृष्णांचे व्यक्तिमत्व दिसून आले आहे. एकदा क्लबात कोल्हटकर गप्पा मारीत होते अन् त्यांच्या विनोदी कोटयांना नुसता ऊत आला होता. तेव्हा एक मित्र त्यांना थट्टेने म्हणाले, "तात्यासाहेब, हे फार झालं. तुम्हाला आता लोक फाजील विनोदाचे जंनक असं म्हणू लागले आहेत" कोल्हटकरांनी त्यांना शांतपणाने पुढील मजेदार जबाब दिला—"अहो ! मला हे सांगा, फाजिलपणा केल्याशिवाय का कुणी कुणाचा जनक झाला आहे ? 'जनक' या








शब्दावरची कोल्हटकरांची मार्मिक कोटी ऐकून सारेजण खो खो करून हसू लागले. अशा गंमतीदार आठवणी या अंकाचे खास आकर्षण ठरावे.

'लेले आणि कोल्हटकर यांच्या पत्रांची पार्श्वभूमी' हा ग. त्र्यं. माडखोलकरांचा लेख चरित्रकारांना दीपस्तंभासारखा मार्गदर्शक ठरावा. मोठ्या माणसांच्या जीवनातले सत्य कधीतरी पुढे आलेच पाहिजे हे त्यांचे मत ग्राह्य असून भावी चरित्रकारांनी त्यांचा हा लेख आवर्जून वाचण्यासारखा आहे. माडखोलकर म्हणतात, "सर्वसामान्य लोकांपुढे अलौकिक व्यक्तींच्या चरित्रातील अशा प्रकारची सत्य नागडीउघडी करून ठेवण्याची गरज नाही हे आचार्य अत्रे यांचे म्हणणे मलाही पटते. तथापि सहृदय जाणकारांना तरी निदान अशा प्रकारची सत्य संपूर्णतया कळलीच पाहिजेत. त्याशिवाय, प्रतिभाशाली व्यक्तींच्या व्यक्तित्वाचे तर राहोच, पण वाङमयाचे यथार्थ आकलन होत नाही. मात्र ती सत्य वाचकांपुढे मांडतांना शक्यतोवर सौम्य आणि सूचक पद्धतीने मांडण्यात आली पाहिजेत' 'कोल्हटकरांच्या चरित्राची साधने' हा माडखोलकरांचा लेखही कोल्हटकर चरित्रसाधनाच्या सामग्रीत मौलिक भर टाकणारा असा आहे. दिवंगतांचे स्मृती-अंक कसे असावेत याचा एक आदर्शच प्रस्तुतच्या 'युगवाणी'च्या 'कोल्हटकर अंका'ने घालून दिला आहे. कोल्हटकरांच्या भावी चरित्रकारांची या अंकाने मोठीच सोय करून दिली आहे. त्याबद्दल मराठी वाङमयसेवक 'युगवाणी'च्या संपादकांना अन् विषेशतः ग. त्र्यं. माडखोलकरांना खचित दुवा देतील. कारण या अंकामागची कर्तुमअकर्तुम शक्ती माडखोलकरच आहेत ही गोष्ट अंक वाचल्यावर सहज लक्षात येते. इतक्या उत्कृष्ट विषेषांकाच्या द्वारे आपल्या गुरूच्या चरित्रवाङमयात अमोलिक भर घातल्याबद्दल भाऊसाहेब माडखोलकरांना धन्यवाद दिल्याशिवाय रहावत नाही.

**–अरविंद ताटके**

(**'युगवाणी'** संपादक : शं. बा. शास्त्री प्रकाशक : विदर्भ साहित्य संघ, नागपूर–१. पृष्ठे : ११२, मूल्य : दोन रुपय).

## मर्तिक . . . मरतिक

जगात काही गोष्टी उलट्या क्रमाने घडतात. त्यांचा क्रम थोडा चुकीचा वाटतो पण अंती तोच बरोबर ठरतो. आयुष्याचा क्रम आणि रीत ठरत नाही; पण आयुष्य प्रवासाची अखेर जन्मण्यापूर्वी निश्चित होते. जन्म झाला की त्याचे मर्तिक होणे अपरिहार्य असते आणि इथेच आयुष्याचा हिशेब ठरवला जातो. अशा या उलट क्रमात भर पडली एका पुस्तकाची–काव्यसंग्रह मर्तिक : कवि चंद्रकांत खोत. पुस्तक प्रसिद्धी-

(पान ५५ वर)

(पान ४६ वरून–**कपट**)

'अरे मास्तर सरकारला सूर्यासारखे हजार डोळे असतात..'

'तर मग ऽ आधी मानकऱ्याचं नुकसान किती, मदत किती हे लोकांना सांगा.' गुणवंत मास्तरनं अधिक सांगितलं.

वम्मू आनंदानं ओरडला, 'शाब्बास मास्तर... वाघ हायस वाघ.'

घडल्या प्रकारानं सर्व गावकरी थक्क झाले. हपीसर आणि मानकरी एकमेकांकडे बघू लागले.

हपीसरानं मग जुगवून घेतलं, 'तुमचे मानकरी पोलीस पाटील आहेत. पोलीस पाटील म्हणजे सरकारी माणूस.. लोकांना वाढल्यावर मग त्यांचं पान.

'फसवताय कशास लोकास्नी.. दाखवा गाडगं.. गाडगं पण दिसंल ताकपण दिसंल' गुणवंत मास्तर रोखून म्हणाला.

'अरे मास्तर असली भाषा चांगली नाही.' मानकऱ्यानं साळसूदपणे सांगितलं.

'कळतंय आमाला. पण आधी तुमचा आकडा हवाय.' मास्तर म्हणाला.

'तुमच्या डोळ्यांनाच दिसतंय. त्यांचं नुकसान गावात सर्वांत अचाट झालंय' हपीसर म्हणाला.

वम्मू ओरडला, 'अरं वा, मोठ्याचं सगळंच मोटं.'

अण्णानं लगेच त्याच्या तोंडावर हात ठेवला.

प्रत्येकजण मानकऱ्याचा आकडा ऐकायला उत्सुक झाला होता.

'सांगा- सांगा लवकर' गुणवंत मास्तरनं निक्षून मागणी केली.

'दोनशे.'

'दोनश ?'

दोनशे ? दोनशे ?? दोनशे ???

प्रत्येकजण स्वतःशीच पुटपुटू लागला.. आणि बजबज माजली.

वम्मू ओरडला, 'आमी घेनार नाय पैसं. साला कालाबाजार हाय कालाबाजार... च्या मारी ऽऽऽ'

मानकऱ्यानं सर्वांना शांत करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचं कुणीच ऐकेना. हपीसराला तर कुणी दादच देईना, तेव्हां त्यानं दप्तर गुंडाळलं...तालुक्याची वाट धरली.

हपीसर गेल्यावर मानकरी लोकांना म्हणाला, 'बाबांनो, या गुणवंत मास्तरनं हपीसराचा अपमान केलाय...ही गोष्ट गावाला कलंक ठरली.'

'दंडाचे पंचवीस रुपय त्यानं गावकीत भरले पाहिजेत.'

त्यावर मास्तरनंसुद्धा उफाळून सांगितलं, 'दोनशातनं तुमीच भरा दंड. खरं भायर काढलं तं झोंबलं. ब्यायला काय न्याय हाय का काय' आणि मग लोकांना म्हणाला, 'गप बसून नाय भागायचं. मामलेदार कचेरीवर मोर्चा काढला पायजे.. तवाच डोळं उगडतील.'

आणि गुणवंत मास्तरनं सगळ्यांना घेऊन तालुक्याच्या मामलेदार कचेरीवर मोर्चा काढला, ढोल ताशे घेऊन, बोंबाबोंब करून. मामलेदाराला सारं सारं समजावून सांगितलं.

काही दिवस गेले आणि दुसराच हपीसर आला. शंभराच्या आत कुणाला मदत मिळाली नाही.

वम्मू आनंदानं नाचला.

पण मानकऱ्याचं तोंड कारटासारं झालं.

• • •






# कुटुंब नियोजनाची गुरुकिल्ली

गेल्या वर्षीच्या वैशाखातली गोष्ट. उन्हाळा मी म्हणत होता. अंगाची लाही लाही होत होती. त्यावेळी कोल्हापूर जिल्ह्यातील वारणा नगर येथील सहकारी साखर कारखान्यातील एका इंजिनियर-वर दुःखाची कुऱ्हाड कोसळली. त्यांचे नाव श्री. लक्ष्मण विष्णु कुळकर्णी. ते पत्नी व तीन मुलांना घेऊन पुण्यानजीक सहलीला गेले होते. सारे कुटुंब मोठे खुषीत होते. पण हा आनंद फार राहिला नाही. त्यांचा बारा वर्षांचा एकुलता एक मुलगा मित्रांच्या बरोबर इंद्रायणीवर पोहायला गेला होता. इंद्रायणी तशी संथ व शांत नदी; पण तिने कुळकर्णींच्या बाळाला कुशीत घेतले. एक क्रूर अपघात घडला ! उमलत्या जीवनाचा एकाकी दुःखद अंत झाला.

ही वार्ता कानावर पडतांच सर्व कुटुंब दुःखाच्या सागरांत सांपडले. परंतु लक्ष्मणरावांच्या दुःखाला पारावार उरला नाही. त्याला कारण तसंच होतं. त्यांनी शस्त्रक्रिया करून घेतली होती. पुन्हां शस्त्रक्रिया करून प्रजोत्पादनक्षमता प्राप्त होईल किंवा नाही त्याबाबत त्यांना काहीच माहिती नव्हती. १९६४ सालची गोष्ट, ते प्रथम शस्त्रक्रियेस तयार नव्हते; परंतु खूप विचारांती त्यांनी निश्चय केला व शस्त्रक्रिया करून घ्यायचं ठरवलं. त्यांना सहा मुलं होती. परंतु तीन मुलं, दोन मुली व एक मुलगा, फक्त जगली. बाकीची तीन मुलें दगावली. त्यांतील दोन तर जन्मल्यापासून थोड्याच दिवसात गमावली. ईश्वराची ईच्छा असं समजून लक्ष्मणरावांनी पत्नीवर अधिक बालकांचा भार न टाकण्याचं ठरवलं आणि या विचारानंच त्यांना शस्त्रक्रियकडे वळविले.

बाळ दगावला आणि लक्ष्मणरावांना आपण आयुष्यात शस्त्रक्रिया करून फार मोठी घोडचूक केली असं वाटू लागलं. कुटुंब नियोजन कार्यक्रमाचा त्यांना हा कडू अनुभव आल्यामुळे त्याविषयी त्यांना घृणा वाटू लागली. पण त्यांना हे ठाऊक नव्हतं की, पुन्हा शस्त्रक्रिया केल्यानंतर प्रजोत्पादनाची गमावलेली शक्ती त्यांना परत लाभणार होती.

एक दिवस रेडिओ ऐकत असतांना त्यांना याचा शोध लागला. काही विशिष्ट परिस्थितीत प्रजोत्पादनक्षमता पुरुषाला पुन्हा प्राप्त करून घेता येते. ते एकतांच त्यांना आनंद झाला. दुःखाने ढगाळलेल्या त्यांच्या अंतःकरणात आशेची विद्युल्लता चमकून गेली. त्यांच्या या विचाराला त्याच कालावधीत वर्तमानपत्रात प्रसिद्ध होणाऱ्या बातम्यांनी दुजोरा मिळाला. क्षणाचाही विलंब न लावता त्यांनी कुटुंब नियोजन अधिकाऱ्यांना लिहीलं. त्यांत त्यांनी पुन्हा शस्त्रक्रिया करण्याचा आग्रह धरला होता. ही गोष्ट १९६९ च्या जुलै महिन्यातील आहे.

त्यांनी उत्तराची उत्कंठेने वाट पाहिली. परंतु त्यांच्या पत्राला बरेच दिवस उत्तरच येईना. ते अगदी निराश झाले. मनाच्या खिन्न अवस्थेत असतांना एके दिवशी त्यांना पुण्याच्या ससून इस्पितळातून एक एक्सप्रेस पत्र आले. त्यात तपासणीसाठी व शक्य असल्यास फेर-शस्त्रक्रियेसाठी तावडतोब इस्पितळात हजर व्हा असे लिहिले होते.

लक्ष्मणरावांचे वय ४२ होते. त्यांना मनापासून आनंद झाला होता. परंतु कुठें तरी मनात शंका डोकावे व वाटे की, ही शस्त्रक्रिया यशस्वी होईल ना ? धडधडत्या मनाने ते शस्त्रक्रियेसाठी इस्पित-ळात दाखल झाले. डॉ. सुलाखे या निष्णात प्लॅस्टिक सर्जनने त्यांच्या-वर शस्त्रक्रिया केली. दोन आठवडे लक्ष्मणराव इस्पितळात होते. नंतर त्यांना १६ ऑक्टोबर १९६९ रोजी घरी पाठविण्यात आले. शस्त्रक्रिया यशस्वी पार पडली आहे. असा दिलासाही त्यांना डॉक्टरांनीं दिला. परंतु काही दिवसानंतर शुक्रबीजाची परीक्षा करण्यासाठी इस्पितळात येऊन जाण्यास सांगण्यात आले. आणि सर्वात आनंदाची गोष्ट म्हणज तपासणीअंती त्यांच्या ठिकाणी प्रजोत्पादनक्षम शुक्रबीज असल्याचे आढळून आले.

लक्ष्मणरावांचे जीवन पुन्हा एकदा उजळून निघाले. कुटुंब नियोजन कार्यक्रमाबद्दल त्यांच्या मनात जी अढी होती ती दूर होऊन तिच्या जागी कृतज्ञता आली. कारण या कार्यक्रमामुळेच त्यांना दुसरी शस्त्रक्रिया करून घेता आली. कुटुंबाला मर्यादा घालण्यासाठी हा कार्यक्रम आहे, असं नव्हे, तर कुटुंबाच्या कल्याणासाठी देखील तो आहे. प्रत्येक कुटुंबाचे कल्याण आहे, राष्ट्राचे कल्याण हे आणि हीच तर या सर्व कार्यक्रमांची गुरुकिल्ली आहे.

* * *



# कुटुंब नियोजनाबाबत महाराष्ट्राचा कल्पक दृष्टिकोन

महाराष्ट्रातील अेका खेडयात कुटुंब नियोजनावर आधारलेल्या अेका लोकनाटयाच्या कार्यक्रमानंतर जेव्हां अेका शेतकऱ्याला या लोकनाटयाचा हेतु काय असा प्रश्न विचारण्यात आला तेव्हां त्याने तात्काळ उत्तर दिले की, घराघरात सुखसमाधान व शांती नांदावयाची असेल तर दोनच मुलांचा सुटसुटीत परिवार असला पाहिजे. हे या लोकनाटयात सांगण्यात आले.

खेडयात राहणारी जनता आता खेडवळ राहिलेली नसून शिक्षणाच्या प्रभावामुळे त्यांच्यात किती समजूतदारपणा आला आहे हे या उत्तरावरूनच दिसून येते.

दुसऱ्या एका खेडयात एका हिंदु व अेका मुसलमान महिलेने, आपल्या मनाला पटते म्हणून व विकट आर्थिक समस्येवर मात करण्याच्या दृष्टीने जेव्हां आपल्या खेडयात शस्त्रक्रिया करून घेण्याची सोय उपलब्ध झाली तेव्हां तात्काळ शस्त्रक्रिया करून घेतल्या.

धर्म, जात, समाज, रुढी या प्रकारची सर्व बंधने झुगारून व्यावहारिक आणि धाडसी दृष्टिकोन वापरून, देशाला चांगला धडा घालून दिल्याची ही उत्तम उदाहरणे आहेत.

आपल्या प्रचंड खंडप्राय देशाच्या कानाकोपऱ्यात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांनीं कुटुंब नियोजनाचा संदेश कशाप्रकारे घराघरात पोहोचवावा याला वरील दोन प्रकारावरून चांगलेच मार्गदर्शन मिळते.

प्रत्येक माणसाप्रत ही मोहीम पोहोचावी यासाठी महाराष्ट्र सरकारने १९६७ साली अेक मोठी धाडसी आणि कल्पक योजना आंखली. महाराष्ट्राच्या कुटुंब नियोजन मोहिमेस या योजनेने अेक प्रकारे ऐतिहासिक क्रांतीच घडवून आणली. तत्पूर्वी १० वर्षे लोकवस्तीवाढीविरोधी जो कार्यक्रम आखण्यात आला होता त्याला पाहिजे तसे यश मिळाले नव्हते. १९५१ साली महाराष्ट्राची वस्ती ३ कोटी २० लक्ष होती. १९६१ साली ही वस्ती ३ कोटी ९५ लक्ष ४० हजार इतकी झाली. तर १९७१ साली ही वस्ती ५ कोटी १ लक्षावर जाईल अशी अपेक्षा आहे. अर्थात या वाढीचे मुख्य कारण म्हणजे स्वास्थ्य, सेवा व औषधपाण्यात झालेली सुधारणा हेच होय. या काळात जननमरणाच्या बाबतीत भलतीच तफावत पडली. जननाचे प्रमाण दर हजारी ३८ झाले तर मृत्यूंचे मात्र १२.७ च राहिले. १९५१–६० दरम्यान मृत्यूचे प्रमाण १९.८ होते. पण जनन प्रमाण मात्र ४१.२ वरून फक्त ३८ वरच आले. यावर उपाय म्हणजे अेकच होता तो म्हणजे संतति नियमन. यासाठी फार मोठ्या प्रमाणावर हा प्रश्न हाताळण्याची आवश्यकता होती. लोकांना या समस्येसंबंधीं आत्मीयता वाटण्यासाठी त्यांचे मोठ्या प्रमाणावर सहकार्य मिळविणे हा अेकच माग उपलब्ध होता. ह्यासाठीं महाराष्ट्र सरकारनें राज्यांतील सर्वच्या सर्व २५ जिल्हा परिषदा आणि समाज विकास शासनाला या कार्यक्रमांत गुंतविण्याचा निर्णय घेतला.

अर्थातच त्यामुळे स्थानिक पुढारीही या कार्यक्रमांत गोवले गेले व राज्यातील २१,३३४ ग्राम पंचायतीही या कायक्रमात सामील झाल्या. स्थानिक पुढारी, सरपंच व इतर प्रमुख व्यक्तींनींही या कार्यक्रमात हिरीरीने भाग घेवून शैक्षणिक प्रसार व शिबिर आयोजनात प्रामुख्याने सहकार्य दिले.

खेडयांतील दांपत्यांना कुटुंब नियोजनाचा स्वीकार करण्यास प्रवृत्त करणाऱ्यास सरकारनें अेक 'सहाय्य योजना' काढली. त्यानुसार आपल्या फुरसतीच्या काळात लोकांचे मन वळविण्याचे काम करण्याबद्दल कार्यकर्त्यांना प्रोत्साहनादाखल काही पैसेही मिळू लागले. पण हा 'सहाय्यक' पूर्ण वेळ काम करणारा कार्यकर्ता नसे. अशा सहाय्यकांची सरकारला व जिल्हा परिषदांना पूरक-कार्यादाखल मदत होते. अशा प्रकारचे ४०,००० सहाय्यक राज्यात आहेत.

महाराष्ट्र सरकारने अंगिकारलेल्या नव्या धोरणामुळे अगदी पहिल्या वर्षातही घवघवीत यश पदरात पडले. फक्त १९६७–६८-मध्ये करण्यात आलेल्या निर्बिजीकरण शस्त्रक्रियांची संख्या ३,३२,३२९ वर गेली. तत्पूर्वीच्या १० वर्षांत झालेल्या अेकंदर शस्त्रक्रियांपेक्षांही हा आकडा अधिक झाला. त्यानंतर हा आकडा सतत वाढतच गेला आणि १९५७ पासून आतापर्यंत जवळजवळ ११,७४,००० शस्त्रक्रिया झाल्या आहेत.

गर्भाशयात लूप बसविण्याची मोहीम १९६५–६६ साली हाती घेण्यात आली व अगदी थोडयाच काळात ही योजना लोकप्रिय झाली. त्याच वर्षी सुमारें १,३०,२१० लूप बसविण्यात आले. दुसऱ्या वर्षी देखील ही संख्या १,४१,६१७ वर गेली. १९६७–६८ साली मात्र थोडी पीछेहाट झाली ती लूप बसविल्यानंतर निर्माण

झालेल्या काही अडचणींमुळेच. त्यावर्षी हा आंकडा अेकदम २८,६६४ वर आला. तेव्हांपासून हा कार्यक्रम जरी मागे पडला तरी 'निरोध'ने मात्र बरीच आघाडी मारली आहे. निरोध वाटपाचे कार्य सर्वत्र व रेल्वेस्टेशनवरही घडाक्याने चालू आहे. व्यापारी पद्धतीने कमी दरात निरोध विकण्याची सोय सर्वत्र उपलब्ध करून देण्यात आली आहे.

सन १९६९ अखेरपर्यंत यामुळे ६,५०,००० जन्म टाळता आले.

महाराष्ट्रात कुटुंब नियोजन लोकप्रिय होण्यासाठीं नवनव्या योजना आंखण्यांत येत आहेत. या योजनात राज्य पातळीवर विकास-गटांत स्पर्धा, कुटुंब कल्याण ग्राम गौरव योजना आणि कुटुंब नियोजन क्षेत्रात अत्युत्कृष्ट काम केल्याबद्दल देण्यात येणारे मुख्यमंत्र्यांचे सुवर्णपदक व स्वास्थ्य मंत्र्यांचे रौप्यपदक या योजनांचाही समावेश आहे.

अशा प्रकारे या लोककल्याण योजनेत अत्यंत घडाडीचा व कल्पक कार्यक्रम योजून महाराष्ट्राने अेक प्रतिष्ठेचे स्थान पटकाविले आहे. महाराष्ट्राने पटकावलेली पांच राष्ट्रीय पारितोषिके हे याचे बोलके प्रतीक आहे.

* * *

## कुटुंब नियोजनाचे अनेक मार्ग

जनसंख्येची प्रचंड वाढ ही समस्या जरी अलिकडील कालातली असली तरी अति प्राचीन काळी देखील मानवाने बाल-जन्म प्रतिबंधक म्हणून निरनिराळ्या पद्धतींचा अवलंब केलेला आढळून येतो. स्त्रियांच्या ऋतुकालावर आधारलेल्या नैसर्गिक पद्धती, त्याचप्रमाणे रासायनिक द्रव्यांचा वापर याची चांगली माहिती प्राचीन व मध्ययुगातील जगातील जवळजवळ सर्व देशांना होती.

आधुनिक शास्त्राने या पद्धती पूर्णत्वास नेल्या असून काही नव्या पद्धतींचाही शोध लावला आहे. आजच्या कुटुंब नियोजकाला आपल्याला योग्य वाटतील त्या पद्धतीचा अवलंब करण्यास भरपूर पद्धती उपलब्ध आहेत.

आज भारत सरकारने देशांतील कानाकोपऱ्यातील लक्षावधी दांपत्यांना आपणास पसंत असलेल्या कुठल्याही पद्धतीचा अवलंब करण्याची सोय करून दिली आहे. याबाबतीत वैद्यकीय सल्ला पण मोफत मिळतो. या सर्व पद्धतींची सोय एक तर मोफत आहे वा अगदी नाममात्र शुल्क घेऊन उपलब्ध केलेली आहेत. गर्भाशयात साधने बसविणे वा निर्बीजीकरण या गोष्टी केवळ मोफतच नाही तर अशा संधीचा फायदा घेणाऱ्यांना खर्चासाठी भरपाई म्हणून काही पैसेही दिले जातात.

लोकसंख्या वाढीवर नियंत्रण ठेवण्यासाठी प्राचीन काळी अस्तित्वात असलेली मुख्य पद्धती म्हणजे "ब्रह्मचर्य पालन". एखादी व्यक्ती या पद्धतीचे यशस्वी अवलंबन करू शकत असे पण मोठ्या प्रमाणावर जनतेला या पद्धतीचे अवलंबन जवळजवळ अशक्यच !




कुठल्याही साधनांशिवाय अवलंब करण्यासारख्या काही पद्धती अर्थात् आहेतच. ऋतुकालावर आधारलेली 'सुरक्षित काल' ही एक पद्धत तर काहींचा विश्वास 'त्रुटित संभोग' पद्धतीवर आहे. पण ह्या पद्धति काही अंशी बेभरवशाच्या व अवचित गर्भसंभव होण्याची अधिक शक्यता असलेल्या आहेत.

कुटुंब नियोजनाला पारंपरिक साधनांचा उपयोग मात्र डॉक्टराच्या वा परिचारिकेच्या मदतीशिवाय करता येतो. या क्षेत्रात पुरुषांनी वापरावयाच्या 'निरोध'चा अंतर्भाव आहे. गेली कित्येक शतके पाश्चिमात्य जगांत 'निरोध' यशस्वीरित्या वापरले जात आहे. आता भारतात दांपत्यांना महागडचा आयात केलेल्या साधनांवर अवलंबून राहण्याची आवश्यकता नाही. देशातच तयार झालेले निरोध औषधाच्या दुकानात व इतरत्र १५ पैशाला ३ या दराने मिळतात.

या व्यतिरिक्त, रुग्णालये, कुटुंबनियोजन केन्द्र, कुटुंब कल्याण केन्द्रे व उपकेन्द्र या ठिकाणी निरोध फुकट वाटण्याची सोय पण उपलब्ध आहे. देशात तयार होणाऱ्या निरोधचा दर्जापण चांगल्या प्रतीचा आहे, ही अभिमानाची गोष्ट आहे.

त्रिवेंद्रम येथील हिंदुस्तान लॅटेक्स लि. या सार्वजनिक क्षेत्रातील कारखान्यात दरसाल १४.४ कोटी 'निरोधां'चे उत्पादन होते. प्रत्यक निरोधाची रवानगी होण्यापूर्वी छीद्र तपासण्यासाठी विद्युत साधनांनी चांचणी होते.

स्त्रियांनी वापरावयाची पारंपरिक साधने म्हणजे डायफ्राम, डुश, फोम टॅबलेट, प्रतिबंधक क्रीम व जेली. या पद्धतीबद्दल विशेष सल्ला कुटुंब नियोजन केन्द्रातील डॉक्टरांकडून मिळेल.

गर्भाशयात बसविण्यात येणारे साधन म्हणजे प्रचलित 'लूप' हे होय. हे प्लास्टीकचे केलेले एक छोटे साधन स्त्रीच्या गर्भाशयात डॉक्टरकडून बसवून घ्यावे लागते. हे साधन बसविण्यास काही क्षणच लागतात. गर्भाशयात हे साधन बरीच वर्षे टिकू शकते व त्यामुळे संततीप्रतिबंध होतो.

पाहिजे तेव्हा लूप काढून टाकता येत असल्यामुळे गरज नसेल तेव्हा तो सहज काढता पण येतो. दुसरे मूल हवे असल्यास हे साधन सहजगत्या काढून टाकता येते. जून १९७० पर्यन्त एकंदर ३४ लक्ष लूप बसविण्यात आले.








पण एखाद्या दांपत्याला दोन वा अधिक मुले असतील तर व त्यांना कायमची सोय करावयाची असेल तर मात्र पतीने वा पत्नीने निर्वीजीकरण शस्त्रक्रिया करून घेणे अत्युत्तम.

पुरुषांच्या शस्त्रक्रियेस 'नसबंदी' म्हणतात. ही शस्त्रक्रिया करण्यास फक्त १० मिनिटे लागतात. डॉक्टर पूंवीजवाहक नलिकेचा छेद घेऊन तेथे एक गाठ बांधतात, शस्त्रक्रिया झाल्याच्या दुसऱ्या दिवसापासून माणूस कामावर जाऊ शकतो. ५–६ दिवस मात्र त्याने सायकलवर बसणे वा वजन उचलणे अशी कामे करू नयेत. ही अगदी सुरक्षित शस्त्रक्रिया असून त्यामुळे संभोग शक्तीत कुठल्याही प्रकारची कमतरता येत नाही.

अशाच प्रकारची निर्वीजीकरण शस्त्रक्रिया स्त्रियांवर पण करता येते. पण स्त्रीला मात्र रुग्णालयात ६ ते १० दिवस राहावे लागते. यात स्त्रीबीज वाहून येणाऱ्या नलिकेचा छेद करण्यात येतो. यामुळे स्त्रीच्या ऋतूचक्रावर कुठल्याही प्रकारचा परिणाम होत नाही व शारीरिक वा मानसिक त्रासही होत नाही.

मे १९७० पर्यंत ७४ लक्ष लोकांवर निर्वीजीकरण शस्त्रक्रिया करण्यात आल्या. ही संख्या जगात एकंदर झालेल्या अशा शस्त्रक्रियांपेक्षा किती तरी अधिक आहे.

काही दांपत्यांना मात्र पोटात घ्यावयाच्या गोळ्याच पसंत पडतील. पण ही योजना विस्तारण्यापूर्वी सरकारने प्रयोगिक पद्धतीने सुरू केलेल्या योजना प्रकल्पांचा अभ्यास व निरीक्षण चालू आहे व त्यांची उपयुक्तता सिद्ध झाल्यावरच मोठ्या प्रमाणावर ही पद्धती अवलंबिण्यात येईल. असा प्रयोग ३०० केन्द्रांत चालू आहे.

हॉर्मोन्सचा वापर करून "डपोप्रोव्हेस" इंजेक्शनचा विकास करण्याबाबत पण अभ्यास चालू आहे. ही इंजेक्शन्स महिन्याने त्रैमासिक वा षण्मासिक पद्धतीने घ्यावयाची असतात यांचे इतर परिणाम शरीरावर काय होतात, यासंबंधी प्रयोग चालू आहेत व त्यांची योग्यता पटल्यावरच राष्ट्रीय पातळीवर त्याचा उपयोग सुरू करण्यात येईल.

अशाप्रकारे आजच्या कुटुंब नियोजकाला एक प्रकारे राष्ट्रसेवा करण्याची ही संधी उपलब्ध झाली आहे, असे म्हटल्यास मुळीच अतिशयोक्ती होणार नाही. आपले कुटुंब मर्यादित ठेवण्यासाठी सल्ला हवा असल्यास कुटुंबनियोजन केन्द्रातील तज्ज्ञ डॉक्टर्स आपली उत्सुकतेने वाट पहात आहेत. * * *

# छोटी माणसे--मोठी कर्तबगारी

भारताचा कुटुंब नियोजन कार्यक्रम हा जननप्रमाण कमी करण्याचा जगातील सर्वात मोठा कार्यक्रम आहे. ह्या कार्यक्रमास हातभार लावण्याच्या दृष्टीने ज्या काही निष्ठावंत लोकांनी विशेष कामगिरी बजाविली तिची थोडक्यात माहिती खाली देण्यात आली आहे.

अर्नाकुलम जिल्ह्यातील अेळीवकारा प्राथमिक आरोग्य केंद्रांतील गट विकास प्रचारक श्री. टी. सी. कृष्णनकुट्टी पोदुवाल ह्यांनी कुटुंब नियोजन प्रकाराविषयींच्या सर्वोत्कृष्ट कामगिरीबद्दल जिल्हा पातळीवरील रोख बक्षीस दोनवेळा पटकविले. त्याच्या यशाचे गुपित म्हणजे त्याने स्वतःवर व स्वतःच्या कुटुंबातील इतर योग्य व्यक्तींवर निर्वीजीकरण शस्त्रक्रिया करून घेतली आणि नंतर आपल्या विभागातील लोकांमध्ये तिचा प्रचार केला.

* *

मध्यप्रदेशांतील धार जिल्ह्यातील राजगड शहरातील नागरिकांनी स्थानिक इस्पितळामध्ये अेक प्रसूती विभाग उभारण्यासाठी १७०० रुपयांची रक्कम गोळा करून ती जिल्हा अधिकाऱ्यांच्या हवाली केली. जिल्हा अधिकाऱ्यांनी ह्या रकमेच्या मदतीने सहा महिन्यांत दहा खाटांची सोय असलेल्या प्रसूती विभाग काढून दिला. ह्या विभागामुळे ह्या छोट्या शहरातील स्त्रियांसाठी निर्बिजीकरण शस्त्रक्रियेची सोय उपलब्ध झाली.

* *

तामीळनाडूमधील दक्षिण आर्काट जिल्ह्यातील सिरुवंथुडू प्राथमिक आरोग्य केंद्रांतील वैद्यकीय अधिकारी डॉ. अेन् कृष्णमूर्ती ह्यांनी १९६८–६९ सालीं १०८१ पुरुषांवर नसबंदीची शस्त्रक्रिया केली. त्यांच्या केन्द्रासाठी अशा शस्त्रक्रियेचा कमाल ५४४ आंकडा ठरवून देण्यात आला होता. त्यामानाने त्यांनी दुप्पट शस्त्रक्रिया केल्या.

महाराष्ट्रातील औरंगाबाद जिल्ह्यातील बाभुळगांव खेड्याचे रहिवासी बानाजी हे आज सत्तर वर्षांचे आहेत. त्यांचा उत्साह इतका दांडगा की ह्या उतारवयांतही त्यांनी स्वतःला कुटुंबनियोजनाच्या प्रचाराला वाहून घेतले आहे. पैशासाठी ते हे कार्य करीत नसून त्यांना जो मोबदला मिळतो, तो ते शस्त्रक्रिया करून घेणाऱ्याला देतात. कुटुंब नियोजन प्रचार कार्य हे एक ध्येय म्हणून त्यांनी पत्करले असून त्यामुळे आपले नीरस जीवन अर्थपूर्ण झाले आहे असे त्यांना वाटते.

पंजाबमधील फरीदकोट येथील एका कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया शिबिरात, केवळ एका दिवसात १०१३ स्त्रियांवर शस्त्रक्रिया करून जागतिक उच्चांक गाठण्यात आला. फेरोजपूर व भटिंगा जिल्ह्यांतर्फे फरिदकोटच्या नगर इस्पितळामध्ये हे शिबीर भरविण्यात आले होते. शिबिरामध्ये केवळ ५०० शस्त्रक्रिया करण्याचे आयोजित करण्यात आले होते. परंतु शस्त्रक्रियेसाठी स्त्रियांची इतकी अहमहमिका लागली की हा आंकडा १००० वर गेला.

अलीकडेच शस्त्रक्रिया करून घेतलेल्या एका स्त्रीच्या सुताराचा व्यवसाय करणाऱ्या २८ वर्षे वयाच्या पतीनेसार्थ उद्गार काढले, 'आमच्या मुलांसाठी आम्ही स्वर्ग निर्माण करू शकणार नाही हे आम्ही जाणतो, परंतु त्याबरोबरच त्यांना आम्ही नरकातही लोटू नये.'

● ● ●

अनुक्रमणिका

## मर्तिक…मरतिक

(पान ५० वरून)

पूर्व जाहिरात मर्तिककार खोत. १९६९-७० सालातील राज्य पारितोषिक प्राप्त आणि याचाही आत्मविश्वासात्मक उल्लेख आधीच होता या संग्रहाबद्दल.

हे पुस्तक आधीच्या जाहिरातीपासून प्रत्यक्ष प्रकाशनापर्यंत सर्वच प्रकार वेगळे केले असल्याने नजरेत अधिक. पुस्तकाचे नाव, आकार, बांधणी आणि अर्पणपत्रिका, प्रकाशनसुद्धा. प्रकटन हा तर सर्वस्वी चंद्रकांत खोत यांचा सर्वथैव स्वतःचा भाग– की जो काव्य आणि काव्य व्यापारात वाचकाला गुंतवतो. मुक्त करतो. 'तुझ्या प्राक्तनसूर्याला नख लावीत, तू विधवा झालीस हे सूर्यगमनी' असे म्हणत–

कवितांची मांडणी–कदाचित वाचक चिरफाड करून विघडवतील म्हणून– कविता १९६८, मालवणी कविता आणि कविता १९६२–६३ अशा विभागात केलेली. प्रत्येक विभाग स्वतंत्र अर्पणपत्रिका देऊन. परत या कविता मूड्स्, विचार, गती, गूढ, वैफल्य अशा तऱ्हेच्या पद्धतशीर जडावात ठेवलेल्या. कैदी. लंबर तीनसो पाँच कल उसकी मरेगी सास'

'भविष्यातील हिंवाळे वद्द होतात.'
'एका नव्या यात्रेला जन्म दिलास'

असा निश्चित जडाव परिणाम साधतो. 'सुझी वाँगचे काऊंटरवरील चलनी नाणे' देऊन 'हिंवाळ्यातील रात्रीचा अर्थ' आणि 'कन्फेशनच्या भिंतीआड. चक्रव्यूह भेद' समजून घेता येतो; पण त्याचवरोवरचा भयकारी 'बंदिस्त खिरस्त' 'उमलण्याआधी कुंडीतली माती वदलून घे' म्हणून सांगून जातो.

इथली कविता काही खोती संस्कार घेऊन स्तब्ध आहे. 'काळोखाच्या पाळण्याभोवती काजव्यांचे दिवे' अशा थाटात किंवा 'रस्ते मरत नसतात रस्ते अमिवा असतात' अशा विवेचनात किंवा 'एक ओढा लांववर एक गीत पिंजत असे' अशा लयीत दिसते. तर कुठे ती 'कौलारातून वळल्या रेषा' घेऊन हळवेपणात शिरते आणि काही टिकाणचे अंक–'वारा वलुते, वत्तीस मजली इमारती, चौसष्ट रांडा, वेचाळीस हाराकिरी, कैदी लंवर तीनसो पाँच, साडेपाच फुटी यात्रा, सहस्र डोळ्यांचे स्तन, नवाचा आकडा घोकत, शाण्णव कुळीचे ओठ, चार खांब, चौऱ्याऐंशी आसने – अंकलिपीची आठवण जारी ठेवतात. अर्थात कविता अंकवद्ध असल्याची कैफियत न ठरावी. तर मयखाने, सास, शहीद, जिहाद, ट्रॅन्झिस्टर, ॲनॅटमी कयामतसारखे अमराठी शब्द अर्णवसूर्यादि अस्सल मराठी शब्दांशी 'वीर्याचे' 'अच्चळ' नाते जोडतात. 'कारागृह', गुहा, आत्म-(हत्या) सूक्तेसारखी कविता अगर 'एका अंतूची कविता' खास विभ्रम करणारी असली तरी एखादी वेध लावून जाते. जशी 'तू'–तू कविता 'टागोर' पूर्वज–वंशजांच्या तफावतीचा काव्यमय हिस्टॉरिक चार्ट वाटावी – जीव लावून जावी ज्यात हंग्री स्टोन्स्चे शांतिनिकेतन, दुनिया निकेतन बनून अनुपम डोळ्यांचे निःशब्द महावळेश्वर ओच्यात झाकते, लिलीच्या फुलांच्या हळुवारतेने. अर्थात ही व्यक्तीची कविता व्यक्तीसाठी केलेली कविता आहे. व्यक्तीने मनात घर केले की त्यांचा उजाळा शब्द व्यापून जातो. जसा तो 'ईश्वर दोन मूडस्,' 'दूरस्थ','सुझी वाँग'मध्ये आहे. ह्या व्यक्तिवाचक कविता त्यामुळे 'कुंती'सारख्या विषयवाचक कवितांहून मिन्न ठरतात.

कवि वदलतो. आमूलाग्र वदलतो. अंतर्बाह्य वदलतो. हे या संग्रहातील कवितांवरूनही स्पष्ट होते. १९६२ ते ६९ मधील रचना 'प्रातर्नमाज' ते 'रवैये'पर्यंत वदलली आहे, ज्यात आशय अधिक गडद होत गेला आहे. दृढता ज्यात पूर्णांशाने उतरली आहे.

'असे व्हावे जसे कधी झाले नाही स्वस्तीक डोळियांच्या स्मशानांत झाले नाही मर्तिक' इथे व्यक्त होणारे मर्तिक (१५ मे १९६२)

'या इथे मी पाहतो माझे मर्तिक' इथल्या दरेक वस्तूला तेच अधिग. हे मर्तिकांचे अर्थच इथले वादशाही वाडे, इथल्या रस्त्यांना मर्तिकांची कवाडे (१८ ऑगस्ट ६८) ला वदलले आहे तर २७ ऑगस्ट ६८ ला ते 'तशी प्रचंड यात्रा तुझ्या शरीरावरून माझी यात्रा तुझ्या शरीरावर पंढ झाली तेव्हा तू तुझ्या आणि माझ्याही मर्तिकाची तयारी केलीस' एवढे पालटले आहे. कारण 'आठवणीतही मर्तिक' होऊ पहाणारे हे काव्य आहे. संतप्ताचे हे काव्य कुणाच्या मागोव्याने चालले आहे? मराठी वाङ्मयात त्याची भर पडली आहे काय ? हे काव्य अगम्य नि निर्वोधच आहे का ? असली कविता म्हणजे दिखाऊपणा नाही का ? असे आणि असे अनेक प्रश्न या संदर्भात विचारले गेले आहेत. अनुत्तरीत राहिले आहेत. या संग्रहात त्याची उत्तरे आहेतही नि नाहीतही. एक गोष्ट प्रकर्षाने आहे की ही कविता स्वतःच्या संदर्भाने, उल्लेखाने, मताने, इम्प्रेशनने लिहिली गेली आहे. स्वतःपुरती आहे. तरीही काव्य आहे. भविष्यात कदाचित् अनेक परिशिष्टांची आवश्यकता भासणारी !

**– प्रेमानन्द मयेकर**








(पान १८ वरून -- टेम्पल व्ह्यू)

यांनी सांगितले. चित्तस्वामी हा शेणोलीकरांचीच दुसरी आवृत्ती ! सैनिकांचे आणि अधिकाऱ्यांचे कपडे धुण्याचे कंत्राट घेतलेल्या गंगूबाई नारायण या बाईकडे चित्तस्वामी हा नोकर होता. चुनावालांच्या घरात पंचनामा करतेवेळी, त्यांच्या झोपण्याच्या खोलीत पलंगाखाली एक ओला शर्ट सापडला होता. त्यावर A 1 Z अशी अक्षरे व एक त्रिकोण होता हे वाचकांना आठवत असेलच. त्या त्रिकोणाची खूण आपण केली असल्याचे व तो शर्ट अझीझचा असल्याचे चित्तस्वामीने सांगितले. तो पन्नास एक लोकांचे कपडे धूत असे. वेगवेगळ्या खुणा तुझ्या लक्षात कशा राहतात व एवढ्या सगळ्या खुणा तुला येथे कोर्टात काढून दाखविता येतील काय असे विचारताच चित्तस्वामीने कोर्टातच एका कागदाच्या कपट्यावर पाच पन्नास खुणा भराभर काढून दाखविल्या आणि कोर्टात जमलेल्या सर्वांनाच थक्क करून सोडले.

चुनावालांच्या जेवणघरात आढळलेले बोटांचे व पंजाचे ठसे फिंगर प्रिंट ब्यूरोचे डायरेक्टर श्री. जहांगीर मंचरजी दारूवाला यांनी स्वतः तपासले. ठशांचे तज्ज्ञ म्हणून त्यांनी तीस वर्षे काम केले होते. त्यांचा याबाबतचा अनुभव दांडगा होता. रेफ्रिजरेटरच्या वरच्या बाजूस आढळलेला बोटाचा ठसा आरोपी अझीझ याच्या डाव्या हाताच्या तर्जनीचा होता व रेफ्रिजरेटरच्या दारावरचा बोटाचा ठसा सय्यद वाकरच्या उजव्या हाताच्या तर्जनीचा होता असे त्यांनी आपल्या साक्षीत सांगितले. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे मटण पेटीवरच्या काचेच्या झाकणावर उमटलेला ठसा सय्यद वाकरच्या डाव्या हाताच्या अनामिकेचा होता. आरोपीच्या वकिलांनी ठशाच्या शास्त्राचा अभ्यास अगदी कसोशीने आणि मेहनतीने केला होता. त्यांच्या तीन दिवसांच्या उलटतपासणीस श्री. दारूवाला यांनी अतिशय समर्पकपणे तोंड दिले. वकिलांच्या उलट तपासणीच्या प्रश्नांना बुद्धीची झिलई होती तर दारूवालांच्या उत्तरांना बुद्धीबरोबरच पस्तीस वर्षांच्या निष्णात अनुभवाची जोड होती.

पुरावा नोंदण्याचे काम या खटल्यातील शेवटचे व चाळीसावे साक्षीदार सब-इन्स्पेक्टर देशमुख यांच्या साक्षीनंतर संपल. देशमुखांची साक्ष नऊ सप्टेंबरला संपली. त्यानंतर तेरा सप्टेंबरपर्यंत दोन्ही आरोपींची कफियत घेतली गली.



बचावाच्या भाषणात आरोपीतर्फे सांगण्यात आले की या खुनाला चार सबळ कारणे असावीत: (१) चुनावालांशी कुणाचे तरी हाडवैर असावे. (२) चुनावाला यांचा सोन्याच्या चोरट्या आयातीशी संबंध असल्याने, त्यांच्याकरवी काही बातमी बाहेर फुटू नये म्हणून या धंद्याशी संबंधित असलेल्या इतरांनी अशा रीतीने केलेला "बंदोबस्त" (३) कोणातरी स्त्रीचा हात या खुनापाठीमागे असावा. (४) संपत्तीची अभिलाषा. बचावाच्या वकीलांच्या म्हणण्याप्रमाणे सरकारतर्फे मांडण्यात आलेला पुरावा हा अर्ध्या कच्च्या दुव्यावर आधारलेला होता. सरकारतर्फे कोर्टासमोर आलेली हकीकत अर्धसत्य होती. काही पुरावे मुद्दाम बनावट तयार करण्यात आले होते. म्हणून, संपूर्ण पुरावा हा विश्वासार्ह नसल्याने आरोपींना संशयाचा फायदा देण्यात यावा.

आरोपींतर्फे कसलाच पुरावा देण्यात आलेला नव्हता. फिर्यादी पक्षातर्फे जे साक्षीदार तपासले गेले त्यांच्या उलटतपासणीमध्ये आरोपींच्या बचावाचे मुद्दे सुचविले गेले होते. आरोपींच्या ट्रंकेत आणि सूटकेसमध्ये सापडलेल्या चीजवस्तू या चुनावाला कुटुंबियांच्याच आहेत असे संशयातीतपणे सिद्ध झालेले नाही व ते त्यांचेच आहेत असे एक वेळ मानले तरी पोलीसांनी मुद्दामच आरोपींच्या ट्रंकेत आणि सूटकेसमध्ये घुसविले आणि खुनाचा व जबरी चोरीचा नाहक आळ त्यांच्या माथी मारला आहे असा बचाव पक्षाचा युक्तिवाद होता. दागिने आणि वेगवेगळी घड्याळे यांची ओळख श्री. व. सौ. चुनावाला यांची मुलगी श्रीमती जहिरा हिनेच केवळ ओळखलेले नव्हते. काही दागिन्यांबाबत ते तयार करणाऱ्या सोनार सराफांनी साक्ष दिली होती. श्रीमती बतुल मर्चंट आणि श्रीमती खातुम आब्बास यांसारख्या त्रयस्थांनी श्रीमती चुनावाला आणि जहिरा यांनीही हे दागिने वापरात असल्याचे पाहिले होते. यामुळे या सर्वांच्या साक्षी न्यायमूर्तींनी विश्वसनीय मानल्या. शिवाय आणखी एक महत्त्वाची गोष्ट होती. दुधासाठी लागणाऱ्या सुट्या पैशांच्या पुड्या बांधून ठेवण्याची श्रीमती चुनावालांची सवय होती हे पूर्वी सांगितलेच आहे. आरोपी अझीझकडे या पुड्या सापडण्याचे कारण काय ?

आपणास अटक केल्यानंतर आमच्या किल्ल्या पोलिसांनी जबरदस्तीने ताब्यात घेतल्या, त्यामुळे आमच्या ट्रंकेमध्ये व सूटकेसमध्ये श्री. चुनावाला यांची चीजवस्तु भरून ठेवण्यास पोलीसांना संधी मिळाली असे दोन्ही आरोपींचे म्हणणे होते. या गोष्टी आरोपींनीच काढून दिल्या हे सिद्ध करण्यासाठी पंच, श्रीमती मनिजेब कात्रक यांचा पुरावा बिनतोड होता. याशिवाय आरोपींनी याबाबत केलेल्या सूचना परस्पर विसंगत होत्या. इन्स्पेक्टर वाकाटकरांच्या उलटतपासणीत आरोपी अझीझतर्फे असे सुचविण्यात आले की त्याला तेवीस ऑक्टोबर रोजी दुपारी २॥ वाजता पकडण्यात आले. (फिर्यादी पक्षाच्या पुराव्याप्रमाणे त्याला सायंकाळी सहा वाजता पकडण्यात आलेले होते). साक्षीपुरावा संपल्यानंतर आपल्या कैफियतीत

आरोपी अझीझने आपल्याला दुपारी तीन सव्वा तीनच्या सुमारास पाडले असे सांगितले. श्रीमती कात्रक हिच्या घरी इन्स्पेक्टर वाकाटकर हे दुपारी एक वाजल्यापासूनच ठिय्या मारून बसले होते अशीही सूचना उलटतपासणीत होती. या चारही मुद्यांचा साकल्याने विचार करता आरोपीच्या म्हणण्यात कसलेच तथ्य नव्हते हे उघड दिसून येत होते. अझीझच्या म्हणण्याप्रमाणे तो दुपारी सव्वा तीन वाजेपर्यन्त घरीच होता. इन्स्पेक्टर वाकाटकर हे कात्रकच्या घरी एक वाजल्यापासून होते तर तेव्हापासून सव्वा तीन पर्यन्त ते आणि आरोपी अझीझ हे काय एकमेकांकडे स्वस्थपणे बघत बसले होते की काय अशी मार्मिक शंका न्यायमूर्तींनी आपल्या निकालपत्रात काढली.

मनिजेव कात्रकच्या घरी आरोपींच्या ट्रंकेत व सूटकेसमध्ये सापडलेल्या चीजवस्तूंचे जाऊ द्या. पण सय्यद वाकर यास अटक झाल्यानंतर त्याच्याकडे १९०५ रुपये एका पाकीटात सापडले होते त्याचे काय? विशेषतः शंभर रुपयांच्या एका नोटेवर श्री. चुनावाला यांची संक्षिप्त सही होती. त्यावावत दोन साक्षीदारांच्या साक्षी झाल्या होत्या. हे पैसे आपल्याकडे सापडले नाहीत असे सय्यद वाकरने आपल्या कैफियतीत म्हटले होते. तरीही आपल्याकडे इतके पैसे कसे आले याचे स्पष्टीकरणही त्याने केले होते. या दोन्ही गोष्टी एकमेकांशी विसंगत आणि म्हणूनच हास्यास्पद होत्या.

गुन्हा झालेल्या दुसऱ्या दिवशीच आरोपींच्याकडे मयतांची संपत्ती सापडली होती हा तर जबरदस्त पुरावा होता. त्याशिवाय आरोपींचे कपडे चुनावालांच्या घरी सापडले होते ही देखील बाब विचार करण्यासारखी होती. एवढेच नव्हे तर दोन्ही आरोपींच्या बोटांचे ठसे चुनावालांच्या घरी आढळले होते. चुनावालांच्या घरी न्हाणीघरात व आसपास काड्याच्या पेटीतील जळक्या काड्या असंख्य पडल्या होत्या. त्यावरून दिवे न लावता काड्या ओढूनच आरोपींनी आपला उद्योग चालविला होता हे उघडच होते. सर्वत्र अंधार असल्याने ओधवजी शहा आणि ळवी याना किंकाळ्या ऐकल्यानंतरही चुनावालांच्या घरी काही विपरीत घडत असल्याची पुसट शंकाही आली नाही हेही स्वाभाविक होते. एक नाही तर चार खून केल्यामुळे मयतांच्या रक्तांचे डाग आरोपींच्या कपड्यावर पडणे साहजिकच होते. या वस्त्रांनीशी ते बाहेर पडणे शक्य नव्हते.म्हणूनच त्यांनी आपले कपडे बदलले. श्री. चुनावालांचे कपडे त्यांनी अंगावर चढवले. आपले कपडे धुण्याचा त्यांनी निरर्थक प्रयत्न केला. नंतर आपल्या कपड्यांवरील धोबी खुणा नष्ट करण्याचा प्रयत्न केला. एवढच नव्हे तर सर्व पुरावाच नष्ट व्हावा म्हणून प्रेतांवर सर्व कपडे टाकून त्यावर रद्दी टाकून त्याला काडी लावली व माणसांची चाहूल लागण्याच्या आत पहाटेच ते पसार झाले होते. बाहेर पडतांना त्यांनी प्रवेशद्वार मुद्दामच पूर्ण लावले नसावे. कारण लॅचचा आवाज होऊन बाहेरच्या बाजूस झोपलेल्या मिस्त्री आचाऱ्याला जाग आली असती ! अंधारातच ही सारी कृत्ये केल्यामुळे गडबडीत एक शर्ट व पॅटचा तुकडा बाजूलाच राहिल्याचे त्यांच्या ध्यानात आले नसावे. शिवाय आगही पूर्णपणे लागली नाही. ओल्या कपड्यां-मुळे ती धुमसत राहिली आणि ती पूर्णपणे धुमसत राहण्याच्या अगोदरच उस्मान आणि मिस्त्री आचाऱ्याने त्या धुमसणाऱ्या ढीगावर व पर्यायाने आरोपींच्या प्रयत्नांवर पाणी ओतले! अंगावर चढविलेले चुनावालांचे कपडे घालून वावरणे धोक्याचे होते. म्हणून तेवीस ऑक्टोबर रोजी पहाटे घरी येताच दोन्ही आरोपींनी आंघोळीची गडबड केली आणि चुनावालांचे कपडे धोब्याकडे दिले. पण ते नेहमीच्या म्हणजे अमेरिकन एक्स्प्रेस लाँड्रीमध्ये न देता ओमेगा लाँड्रीमध्ये दिले. सव्वीस ऑक्टोबर रोजी आरोपी सय्यदअल्ली यास घेऊन पोलीस पुनः एकदा मनिजेव कात्रक हिच्या घरी आले होते. त्यावेळी एका वहीत ठेवलेल्या लाँड्रीच्या तीन पावत्या अझीझने काढून दिल्या होत्या. त्यापैकी दोन पावत्या २३–१०–६८ च्या होत्या. एक पावती ओमेगा लाँड्रीचे मालक शमसुद्दिन कमरुद्दिन यांची साक्ष झाली होती. तेवीस ऑक्टोबर रोजी आरोपी अझीझ याने तीन कपडे ड्रायक्लीनिंगसाठी आणले होते त्यावर चुनावालांची आद्याक्षरे होतीच. पण त्याच्या बाजूस शमसुद्दीन याने आपल्या लाँड्रीची खूण 'O' व आरोपीची आद्याक्षरे AZ अशी लिहिली होती. अशा रितीने अनेक बारीक सारीक घटनांची संगतवार साखळी जुळत होती आणि या दोनच आरोपींनी चुनावाला कुटुंबियांचा व ॲनी फर्नांडीसचा खून केला व चुनावालांच्या संपत्तीची जबरी चोरी केली व खून झाल्यानंतर गुन्ह्याचा पुरावा नष्ट करण्याचा प्रयत्न केला हे तीनही आरोप संश-यातीतपणे सिद्ध होत होते.

श्री. चुनावाला यांचा खून बहुधा श्रीमती बतुल मर्चंट हिच्या परागंदा नवऱ्याने काही माणसांच्या साहाय्याने केला असावा अशी बचाव पक्षाची सूचना होती. आपल्या पत्नीच्या, मुलांच्या सहवासाला वंचित झाल्यामुळे व घराला मुकल्यामुळे तिच्या नवऱ्याने उगवलेला हा सूड आहे असा त्यांचा युक्ति-वाद तर फारच हास्यास्पद होता. हा युक्तिवाद करतेवेळी शहाजीत खानाला झालेल्या दहा बारा जखमांचा आधार वकीलांनी घेतला. ज्या अर्थी या अजाण बालकाला इतक्या वेळा भोसकले गेले त्या अर्थी चुनावालांच्या कुटुंबाचा निर्वंश करणे, त्या वृद्ध दांपत्याच्या डोळ्यादेखत निर्वंश करणे ही सूडबुद्धी त्यामागे होती असे बचाव पक्षाला सुचवायचे होते. पण ही सारी सूचनाच मुळी पोकळ डोलाऱ्यावर उभारलेली होती. बचावपक्षाची सूचना अशी होती की, श्री. चुनावाला आणि श्रीमती मर्चंट यांच्या पतीने भागीदारीमध्ये मिलिटरीचे कंत्राट घेतले होते. पन्नास साठ लाखांचे ते कंत्राट होते. माल पुर-विण्यासाठी ज्या व्यापाऱ्यांकडून त्यांनी माल घेतला त्यांची बिले चुकती केली नाहीत म्हणून व्यापारी श्री. मर्चंट यांच्या पाठीमागे तगादा लावू लागले. ह्या तगाद्यातून व त्यातून उद्भवणाऱ्या कोर्ट-

मानगडीतून निसटून जाण्यासाठी श्री. मर्चंट यांना परागंदा होण्याचा सल्ला श्री. चुनावाला यांनी दिला होता असे बचाव पक्षाचे म्हणणे होते. श्रीमती बतुल मर्चंट यांनी तर ही सूचना साफ धुडकावून लावली होती.

मिलिटरीबरोबर पन्नास साठ लाखाचे कंत्राटही काही साधी-सुधी बाब नव्हे. कोठे तरी, कसली तरी चिठ्ठीचपाटी किंवा करार अस्तित्वात तरी पाहिजे ? ही कंत्राटे म्हणजे 'वाऱ्यावरची वरात' थोडीच होती ? पण बचाव पक्षाने कसल्याच प्रकारचा लेखी पुरावा सादर केला नव्हता. बरे, कंत्राटाचा करार झाला होता म्हणून वादा-करिता गृहित धरले तरी व्यापाऱ्यांचा तगादा चुकविण्यासाठी श्री. चुनावालांनी श्री. मर्चंटना पळून जाण्याचा सल्ला दिला हे म्हणणेच मूर्खपणाचे होते. पैसे देण्याचे चुकविणे म्हणजे काही फौजदारी गुन्हा नव्हे, फार झाले व्यापाऱ्यांनी दावे लावले असते. शिवाय श्री. चुनावाला हेही भागीदार असल्याने श्री. मर्चंट यांनी पळून जाण्यामुळे श्री. चुनावाला सुटले नसते. धनकोला कोठल्याही भागीदाराकडून पैसे वसूल करून घेता येतात असा कायदा आहे. चुनावालांसारख्या धनाढ्य इसमास सोडून व्यापारी श्री. मर्चंट यांच्या पाठीमागे कशाला लागले असते ? न्यायमूर्तींनी हाही प्रश्न निकालात काढला.

बचाव पक्षाचा दुसरा मुद्दाही असाच चमत्कारिक होता. श्री. चुनावाला यांचा सोन्याचा चोरटा व्यापार करणाऱ्यांच्या टोळीशी संबंध होता. निदान ते आपल्या मोटारी तरी या टोळीवाल्यांना वापरण्यासाठी देत. चुनावाला यांच्याकडून कस्टम्सच्या लोकांना आपला सुगावा लागू नये यासाठी श्री. चुनावाला यांचा काटा काढावा या इराद्याने त्यांचा खून करण्यात आला असावा. हा युक्तिवादही पोकळ व फसवा होता. श्री. चुनावाला यांचा सोन्याचा चोरटा व्यापार करणाऱ्या टोळीशी संबंध होता याला आरोपीच्या तोंडी शब्दांखेरीज कसलाही पुरावा नव्हता. तसा संबंध असेल असे एक वेळ वादाकरिता गृहीत धरले तर अशा माणसांनी इतर तीन निष्पाप व्यक्तींची निर्घृण हत्या करण्याचे कारणच मुळी काय होते ? श्री. चुनावाला यांना ठार करण्यासाठी त्यांच्या घरातच शिरण्याचे प्रयोजन काय होते ? त्यांना एकटे गांठून मारण्याच्या हजार संधी उपलब्ध होत्या ! खुनाचा उद्देश हा असता तर खून केल्यानंतर त्यांचे जडजवाहीर पळविण्याचे काय कारण होते ? आणि ते पळविल्यानंतर ते आरोपींच्या ट्रंकेत आणि सूटकेसमध्ये सापडण्याचे कारण काय ? आपल्या ट्रंकेत आणि सूटकेसमध्ये ते पोलीसांनी जबरीमध्ये घातले गेले आहेत या आरोपींच्या निरर्थक युक्तिवादाचा उहापोह वर केलाच आहे. बचावपक्षाचे वरील म्हणणे मान्य करणे म्हणजे या बिचाऱ्या निर्दोषी आरोपींना नाहक शिक्षा देण्यासाठी मुंबईचे पोलीस अधिकारी, पंचसाक्षीदार, अमेरिकन एक्स्प्रेस लाँड्रीचे मालक, म्हातारी मनिजेब कात्रक यांनी मोठाच कट रचला होता असे मानले पाहिजे असा उपहासात्मक शेरा न्यायमूर्तींनी आपल्या निकालपत्रात दिला.

> पुढील सूचना येईपर्यंत कवि मित्रांनी दीपावलीकडे कविता पाठवू नयेत ही विनंती.
>
> —संपादक

## तपास अधिकाऱ्यांना धन्यवाद

पुराव्यात आलेल्या सर्व मुद्यांचे अतिशय चिकित्सकपणे न्याय-मूर्तींनी विश्लेषण केले. आरोपींच्या विरुद्ध आलेल्या परिस्थितीजन्य पुराव्यातील साखळी संपूर्णपणे जमल्यामुळे हा गुन्हा आरोपींनी एक-मेकांच्या संगनमताने केली आहे हे संशयातीतपणे सिद्ध होत होते. न्यायमूर्तींनी आरोप सिद्ध झाल्याचे जाहीर केले. त्यांनी ३० सप्टेंबरला निकाल सांगायला सुरुवात केली. ता. ४ ऑक्टोबर रोजी निकाल पुरा झाला. खून करणे व जबरी चोरी करणे यांचा कट केल्याचा आरोप मात्र सिद्ध झाला नाही असे न्यायमूर्तींनी ठरविले. (इंडियन पीनल कोडाप्रमाणे गुन्ह्याचा कट करणे हा एक स्वतंत्र गुन्हाच होतो.) खुनाच्या आरोपाबद्दल दोन्ही आरोपींना फाशीची सजा फर्मावण्यात आली. जबरी चोरी केल्याच्या आरोपावरून प्रत्येकास सहा वर्षे सक्त मजुरीची सजा फर्माविण्यात आली. दोन्ही सजा एक-दमच भोगावयाच्या होत्या. खुनाच्या मुख्य आरोपाबद्दल आरोपींना दोषी ठरवून सजा दिल्या कारणाने, गुन्ह्याचा पुरावा नष्ट करण्याचा प्रयत्न केल्याच्या गुन्ह्याबाबत न्यायमूर्तींनी खल केलाच नाही. गुन्ह्याचा तपास अगदी थोड्याच काळात मोठ्या तत्परतेने आणि चोखंदळपणे केल्याबद्दल सी. आय. डी. च्या सर्व अधिकाऱ्यांबद्दल न्यायमूर्तींनी आपल्या निकालपत्रात गौरवोद्‌गार काढले.

सी. आय. डी. शाखेचे प्रमुख श्री. सामी हे खटला सुरू होण्या-पूर्वीच सेवानिवृत्त झाले. त्यांच्या कारकोर्दीतील ही त्यांची शेवट-चीच केस होती. त्याचप्रमाणे न्यायमूर्ती कापडिया हेही लौकरच सेवानिवृत्त झाले. त्यांच्या कारकोर्दीतीलही हा शेवटचाच खटला होय हे या खटल्याचे एक वैशिष्ट्य.

फाशीची सजा फर्मावल्यानंतर त्याला उच्च न्यायालयाची मंजुरी आवश्यक असते. फाशीची सजा ही सर्वात मोठी सजा असल्याने व तिची अंमलबजावणी झाल्यानंतर त्या निर्णयात काही चूक आढळल्यास नंतर काहीच करता येत नसल्याने, न्यायदानाच्या कामी कसलीही चूक राहू नये या उद्देशाने कायद्यात ही तरतूद केलेली आहे. आरोपींनी निकालाविरुद्ध अपील केल्यास ते अपीलही मंजु-रीच्या प्रकरणाबरोबरच सुनावणीस निघते. यातील दोन्ही आरोपींनी अर्थातच अपील दाखल केले. त्यांचे अपील आणि फाशीच्या शिक्षेचे मंजुरीचे प्रकरण ही दोन्ही एकत्रच सुनावणीला निघाली. दोन्ही आरोपींच्या विरुद्ध भक्कम पुरावा होता. सत्र न्यायाधीशांच्या निर्णयामध्ये कसलीही उणीव किंवा तर्कदुष्ट विधाने उच्च न्याया-लयाला आढळली नाहीत. त्यामुळे निकालामध्ये हस्तक्षेप करण्याची जरुरी नव्हती. उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तींनी खालच्या कोर्टाचा निकाल कायम करून आपल्या संमतीचे शिक्कामोर्तब केले !

• • •





# "नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !"



शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅबलेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती एवढी कणखर आहेत.

## व्हिमग्रॅन

अनेकविध जीवनसत्त्वे
व खनिजे असलेल्या टॅबलेटस






® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई.आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यानी मिळविली आहे.

**व्हिमग्रॅनची अवघी एक टॅबलेट दिवसासाठी लागणारा सारा उत्साह मिळवून देते.**

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

Shilpi-VIM-11A/70

REGD. NO. MH–450 Licence No. 170 to post without pre-paymet OCTOBER 1970

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay–4·










अनुक्रमणिका